


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका












रसिक महाराष्ट्राचा साहित्य-कला-विलास

ऑक्टोबर १९६७ • वर्ष २३ वे • मूल्य १। रु.


## श्रे य ना मा व लि–

मराठी कारखानदारांचे स्वस्तिक––अर्थातच वसंतराव वैद्य–**डॉ. मनोहर माधव अळतेकर** • मी, कवि आणि प्रेयसी... हे कुठले त्रिकुट?–**श्रीकांत पुरोहित** • सहस्रसूर्यांची झळाळी–अणुस्फोटाची दाहकता... **हरिहर उसेंकर** • सलील चौधरी–'ए ग्रेट कंपोजर'...**भास्कर उत्तरवार** • सूळ–सोन्याचा झाला तरी तो सूळच....**लुई फर्नांडिस** • कहाणी नितम्बवतीची–शरद चांदण्याची खुमारी वाढविणारी...**आनंद साधले** • कोण करील याचा सन्मान?–स्वा. सावरकर यांच्या कर्तृत्वाचा आणखी एक पैलू...**अरविंद ताटके** • नैनं दहति पावकः–ज्योतीने दिलेला चटका...**सौ. यमुना शेवडे** • पूनमका चाँद–**बाबुराव कामत** आणि इंद्रधनुष्य–**ज्ञानेश्वर नाडकर्णी**, दीपमाला, ऐसी अक्षरे–आत्रेय कथा...**पद्माकर कुळकर्णी,** सारे प्रवासी घडीचे...**प्रा. विलास चापेकर.**


Gram : Dalalart
टे. नं. ३५७७६५

दलाल आर्ट स्टुडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

* संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १। रु. + रजि. पोस्ट ५५ पैसे. वार्षिक वर्गणी, दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेली मतें ही चालकांचीहि अधिकृत मत असतातच असे नाही.





**Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57**
**DIPAVALI : Dalal Art Studio, 40-42, Kennedy Bridge, Bombay - 4.**





अनुक्रमणिका





## दलाल आर्ट स्टुडिओ

४२, केनेडी ब्रीज, मुंबई, ४,
टेलिफोन : ३५७७६५ ★ तारेचा पत्ता DALALART

● **वर्गणीदारास सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रवार्षिक वर्गणी रु.२५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशीं वार्षिक वर्गणी १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होता येतें.

● **अंक न पोचल्याच** कळवावयाचें झाल्यास ५ तारखपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी–जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरांत सामान्यत: कळविला जातो. पोस्टेज असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसे पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.


# ‘चौदा कॅरेट’ कारभार

**दसरा**....शिलंगण....सोन्याची प्रतिकात्मक लयलूट..सुबत्ता आणि सुराज्य यांचे गमक म्हणून आपल्या पूर्वजांनी सोने लुटावयाचा तो प्रघात पाडला. त्यातील समाजवाद कार्ल मार्क्सला पटला. त्याने तो उचलला. आणि लाल बासनात गुंडाळून जगाला दिला. भारतात डांगे-मिरजकर–दसु–घोष–नंबुद्रिपाद यानी तो वसा घेतला. पण ते बासन सोडावयाचे कसे यावरून झालेल्या व सुरू असलेल्या हिसकाहिसकीत त्या लाल आवरणाचीच लक्तरे लोंबू लागली. महाराष्ट्रात तर मराठी माणसाच्या जागया झालेल्या अस्मितेने त्या मार्क्स भक्ताना पळती भुई थोडी झाली आहे. हेच काय ते यंदाचे दसऱ्याचे शुभ वर्तमान अगदी बावनकशी नाही. तरी चौदा कॅरेटपेक्षा पुष्कळच बरे–पण ही बाब वगळता सगळीकडे चलनीत असलेल्या चौदा कॅरेट सोन्याचे पितळ पार उघडे पडले आहे.

मोरारजीभाईनी रणदुंदुभी फुंकली. वेतन गोठविणार, प्राप्ती गोठविणार–नफाही गोठविणार पण त्या दुंदुभीची हुडहुडीच त्याना इतकी जबर बसली की उब घेण्यासाठी व आणण्यासाठी ते वाजत गाजत अमेरिका व युरोपला रवाना झाले आहेत ! तसेच ते जगजीवनराम भारताचे अन्नमंत्री. त्यांचा थाट काय विचारता ? राणा भीमदेवी आवेशाने गर्जना करते झाले की आम्ही देऊ तितक्या कोट्यातच राज्य सरकारने आपल्या जनतेचे पोट भरण्याची व्यवस्था केली पाहिजे. पण काय चमत्कार ! पंतप्रधानांचे घरासमोर प. बंगालच्या खासदारानी लाक्षणिक धरणे धरले. धरणेधराचा पार्ट अदा करण्यासाठी प. बंगालचे मंत्रीही बाडबिस्तारा बांधून तयार झाले. आणि दिल्लीला साक्षात्कार झाला बंगभूच्या श्रेष्ठत्वाचा ! झाले. धरण्याचे नाटकही झाले. एकमेकांच्या आरत्याही ओवाळण्यात आल्या. आणि वर धान्याची दक्षिणाही उपटली दडपशाही पद्धतीने वागणाऱ्या बंगालने ! जगजीवनराम तुमचे हे असे नव्हे होते हो व्हावयाला...!

रांचीला दंगल झाली. नेहेमीप्रमाणे चार मुडदे पडल्यावर हालचाल (पोलिसांची) सुरू झाली. मग मंत्री–केंद्रीय मंत्री पंतप्रधान यांची भेट हे नाटक पार पडले. याच नाटकाचा दुसरा अंक काश्मीरमध्ये घडला. पण रांचीबद्दल राणी लक्ष्मीबाईप्रमाणे गर्जना करणाऱ्या पंतप्रधान श्रीमति गांधी यांनी काश्मीरी पंडितांच्या रागाला तोंड देण्याचे काम मात्र चतुरपणे नेमके गृहमंत्री श्री. यशवंतराव चव्हाण यांचेवर टाकले. व त्यानीही ते त्यांच्या धूर्त स्वभावानुसार पार पाडले. आणि ‘यशस्वी’ होऊन ते परत आले. या भानगडीत बिहारमधील अल्पसंख्यांक आणि काश्मीरचे सादिक यांचेच पितळ उघडे पडले.

आणि कळस म्हणजे छागलांचा राजीनामा. छगला अहो आपल्यासारख्या समतोल सनदी शिस्तीत बुद्धीत मुरलेल्या वयोवृद्ध माणसाने तरी असे इंदिरेला का पोरके केलेत हो ? आता तेथे दुसरा लायक अल्पसंख्यांक मंत्री कोठून आणावयाचा हो ? फकरूद्दीन अहमद याचे विरुद्ध रांचीला खुद्द पंतप्रधानांकडेच लेखी तक्रारी गेल्या आहेत. शहानवाजखान याना ती ‘परराष्ट्रीय’ जबाबदारी पेलणार तरी कशी ? पण एक मात्र खरे या राजीनाम्याने छगला यांचेही अंत:करण शुद्ध पितळीच असल्याचे सिद्ध झाले. त्यांच्या राजीनाम्याचे खरे कारण फारच वेगळे असावे असे पोरांपासून तो थोरांपर्यंत सर्वच म्हणत आहेत. नि एकेकाळी शिक्षणखाते संभाळलेल्या या भल्या माणसाला भारतीय शैक्षणिक धोरणाच्या वाटचालीची चाहूल नसावी हे मानणे अशक्यच वाटते. एक मात्र खरे. छागला ज्याना सलत होते, त्यानी डॉ. सेन यांच्या धोरणाची ढाल करून छगला यांना चारीमुंड्या चीत केले. म्हणजे ते बाद करणारेही हिणकस... कारण छागलांच्या परराष्ट्र खात्यातील धोरणाविरुद्ध त्या स्वपक्षीय माणसांना उघड बंड पुकारणे स्वार्थापायी अशक्य झाले होते. सारांश सर्वच चौदा कॅरेटचा मामला...

मोरारजी तुम्ही आणलेले चौदा कॅरेट हे असे कायमचेच माथी बसेल अशी कल्पना तुम्हाला तरी होती का हो ?

—संपादक












Commander S. S. Kumar, I.N.,
Gunnery School, Kochin-4.
11-9-67

Dear Mr. Dalal

I roughly enjoyed reading the Dipavli Naval Special Issue. It is indeed hearting to know that your esteemed magazine is constantly endeavouring to arouse interest of our country-men in the Armed Forces of the Nation and their glorious traditions and heritage.

Nothing is more important to the survival of Democracy in our country than that the farmers and soldiers, workers and sailors, and merchants and airmen are closely integrated and strive towards the fullfilment of common objective for the betterment of our Mother-land.

With regards.

Yours faithfully
S. S. Kumar

## 'तेजाची बाळे !'

स. न. वि. वि

दीपावली ऑगस्ट १९६७ चे अंकात श्री. प्रभाकर शेणई लिखित "तेजाची बाळे" ही ऐतिहासिक संवादात्मक कथा प्रसिद्ध झाली आहे. सदर कथेतील काही माहिती इतिहास अनुसरून नाही. "दीपावली" सारख्या प्रथम श्रेणीच्या मासिकात आल्यामुळे या कथेची दखल घेणे भाग पडत आहे.

दि. १२ एप्रिल १६८९ रोजी किल्ले रायगडांवर येसूबाई महाराणीसाहेब, सेनापति संताजी घोरपडे, प्रल्हाद निराजी व राजाराम महाराज ही प्रमुख मंडळी पुढील योजनांविषयी मसलत करीत आहेत. संभाजी राजे कैद झाले आहेत. इतिकादखानाचा रायगडाला वेढा पडला आहे, येसुबाईसाहेब खानाच्या स्वाधीन गड करण्याच्या विचारात आहेत अशा पार्श्वभूमीवर कथेस सुरुवात केली आहे.

महाराष्ट्राच्या लाडक्या शंभु राजांचा वध दि. ११ मार्च १६८९ रोजी झालेला होता !

तुम्ही सर्व पराक्रमी सरदारांनी एकविचारे चालून राजारामांनी आपल्या वायकांमुलांसह बाहेर पडावे, आम्हास मुलांस घेऊन राहण्यास योग्य जागा रायगडांसारखी नाही, तुम्ही सर्व बाहेर पडल्यावर शत्रु तुमचे अंगावर जातील तुमचा सर्वांचा जमाव एकेठिकाणी पोक्त झाल्यावर आम्हास काढून तिकडे न्यावे येसुबाईसाहेबांच्या या सल्यानुसार राजाराम महाराज चैत्र व. १० शुक्रवार दि. ५ एप्रिल सन् १६८९ रोजी रायगडाहून प्रतापगडी गेले होते. दि. १२ एप्रिलला ते रायगडी नव्हते!

शक्य तो प्रतिकार करून किल्ला लढविणे व नाईलाज झाल्यावर गड सोडणे ही मराठ्यांची युद्धनिती होती. गडात गड रायगड अति अवघड. त्या प्रसंगी गडावर सर्व सामुग्री विपुल होती. गड कित्येक दिवस लढविता येईल ही खात्री होती. दि. २५ मार्च १६८९ ला खानाने वेढा घातला, सतत सात महिन्याचे वर गड झुंजला. नाईलाज झाल्यावर दि. १९ ऑक्टोवर १६८९ रोजी गड खानास शरण गेला.

मोंगलांचा सेनासागर स्वराज्य बुडविण्यासाठी प्रचंड सामर्थ्यानिशी खवळून उठला असता संभाजी राजांच्या तोंडी शरणागतीची भाषा नव्हती. निराशेचा उद्गार नव्हता. औरंगजेबासमोर कैदेत देखील त्यांनी आपली गर्दन झुकविली नाही, दयेची याचना केली नाही नि त्यांनी बेडरपणे मृत्यूला आव्हान दिलं. शूर शंभूराजांची राणी, महाराष्ट्राची महाराणी येसुबाई साहेब इतकी अगतिक कशी होईल !




"राजे शिर्के फितूर आहेत. वाघ दरवाज्याने गडावरून निसटून जा असा सल्ला येसुबाई देतात" कथेतला उल्लेख चुकीचा आहे. राजाराम महाराज जिंजीच्या किल्यात वेढले गेले असता हा प्रसंग घडला आहे. गणोजी शिर्के हे थोरल्या महाराजांचे जावई परंतु स्वराज्याविरुद्ध त्यांची मदत मोंगलांना होती. जिंजीच्या गडाबाहेरील पहाऱ्याची एक चौकी गणोजीची होती! खंडोबल्लाळ चिटणीस यांनी अपरात्री त्याचे गोटात जाऊन राजाराम महाराजांस वेढ्यातून निसटून देण्याची त्यांस गळ घातली. चिटणीसांनी स्वतःची दाभोळप्रांताची वंशपरंपरागत मिळालेली वतने गणोजी शिर्के यांस अर्पण केली ! वतनांच्या मोबदल्याखातर गणोजी शिर्के याने महाराजास जाऊ दिले. खंडोवल्लाळसारखे स्वामीनिष्ठ स्वराज्यासाठी कणा कणाने मेले नि गणोजीसारखे संधीसाधु वतनाने उद्धरले! आजहि आम्ही हेच पहातो. महाराष्ट्रासाठी मेले कोण नि खासदारकी, आमदारकी, मंत्रीपदांनी उद्धरले कोण?

अंबरनाथ —वसंत त्रिंबक कर्णिक










# मराठी कारखानदारांचे स्वस्तिक



**श्री. वसंतराव वैद्य**

**डॉ. मनोहर मा. अळतेकर**

**माझे** सर्वसामान्य ज्ञान अगदीच सुमार नसल्यामुळे 'स्वस्तिक रबर प्रॉडक्टस्' आणि वसंतराव वैद्य ही दोन विशेषनामे माझ्या कानावरून गेली होती. पण त्याबद्दल 'विशेष' असे मला काहीच माहिती नव्हते. वसंतराव वैद्यांनी रंगीबेरंगी फुगे तयार करण्यापासून प्रारंभ केला आणि पुढे – हा कोणत्याहि चरित्राचा 'किर्लोस्करी' प्रारंभ आणि 'पुणेकरांची सोय' म्हणून प्रसिद्ध किंवा त्यामुळे कुप्रसिद्ध झालेली संततिनियमनांची साधने 'स्वस्तिक कारखाना' बनवतो ही अद्भूतरम्य वार्ता यापलीकडे माझी मजल गेली नव्हती. सुमारे तीन वर्षापूर्वी पुण्याला एका मोठ्या लग्नसमारंभात महाराष्ट्रीय कारखानदारांच्या ह्या 'स्वस्तिकाला' मी प्रथम पाहिले.

नवरदेव दोन दिवसांनीच इंग्लंडला सहकुटुंब जाणार होते. नवरदेवाचा हट्ट म्हणा, रुसवा म्हणा किंवा मागणे म्हणा, काही 'लई' नव्हते. मुंबई शहरातल्या एका बड्या हॉटेलात त्याला वसती करावयाची होती. अडचण पैशाबद्दल मुळीच नव्हती. पण परदेशी प्रवाशांचा मोसम त्यावेळी जोरात असल्यामुळे सगळी हॉटेले 'हाऊसफुल्ल' होती. वरपिता आणि मी एका विख्यात कारखानदाराकडे लग्नाची अक्षत देण्यास गेलो. सरकारस्वारी न भेटता, राणीसाहेब भेटल्या. मुंबईच्या एका आलीशान हॉटेलात त्यांच्या चार दोन खोल्या वर्षाच्या करारानें असतात हे 'अंतस्थ वृत्त' आम्हाला कळले होते खरे. पण बाईसाहेबांच्या बाबतीत ते 'वळले' मात्र नाही. आमच्या अक्षताना उडवाउडवीच्या उत्तरांच्या वाटाण्याच्या अक्षता मिळाल्या. पण नवरदेवांच्या तीर्थरुपांनी त्या प्रख्यात 'एका कोळियाला' गुरु केले असावे, कारण (उंच जागी पण दुसऱ्या) मांडवात वसंतराव वैद्यांच्या समोर आपल्या मागणीचे जाळे विणावयास त्यांनी सुरवात केली. वसंतराव आपखुषीने आणि उत्साहाने ह्या जाळ्यात अडकले. संध्याकाळच्या आत 'जो जे वांछील तो ते लाहो' हे वचन त्यानी सार्थ करून दाखविले. पण त्यासाठी त्यांच्या मुंबईच्या मॅनेजरसाहेबाना किती धावपळ आणि किती लटपटी कराव्या लागल्या हे नंतर आम्हाला कळले. हॉटेलात कितीही पैसे दिले तरी औषधालाही जागा नसल्यामुळे मॅनेजरांनी मालकाना शेवटी अपोलो बंदरवरच्या रेडिओ क्लबचे पैसे भरून तहहयात सभासद केले. सभासदाला राहाण्यास खोली मिळते. त्या खोलीत वधूवरांची सोय झाली. परत त्यांचा दोन दिवस योगक्षेम चालावा म्हणून १५० रुपयांचा दाणागोटा भरला इतके करून त्याचा गाजावाजा नाही. 'आधी केले' पण कोणालाहि सांगितले मात्र नाही. वसंतराव वैद्यांच्या सौजन्याचे व कार्यक्षमतेचे घडलेले हे पहिले दर्शन. कौतुक कुणाचे करावे! उदारधी धन्याचे की त्यांची आज्ञा अक्षरानुसार अंमलात आणणाऱ्या नोकराचे, हेच आम्हाला कळेना

त्याच लग्न समारंभात वैद्यांच्या एका बालमित्रांचा–ओगले यांचा परिचय झाला त्यामुळे 'वैद्य' ह्या विषयावर अधुनमधून बातचीत झाली. "आपण दोघे सांगलीचे, एकाच शाळेत व एकाच वर्गात शिकलो, कॉलेजात बरोबरच होते, मुंबईत वसंतराव बी. एस्‌सी. टेक्. चा अभ्यास करताना शिवाजीपार्कला आपण एकाच घरात कसे रहात होतो" ह्याची रसाळ वर्णने ओगल्यांच्या तोंडून ऐकली. त्यावेळी अस्मादिक तळेगावला कला, विज्ञान व वाणिज्य ह्यांचे महाविद्यालय सुरू करण्यासाठी 'इंद्रायणी









विद्यामन्दिर' ह्या नांवाची एक संस्था काढून बसले होते. जो संस्था काढीत नाही किंवा विद्यमान संस्थेत लुडबूड करीत नाही तो मराठी माणूसच नाही. एका पुणे शहरात लोकसंख्येपेक्षा संस्थांच्या पाट्यांचीच संख्या ५–१० ने अधिक आहे असे म्हणतात. आपल्या चिमुकल्या इंद्रायणीला वैद्यांचा समुद्र येऊन मिळाला तर सोन्याहून पिवळे होईल असे मला वाटले. ओगल्यांचे नांव गणेश असल्यामुळे 'गणेशायनमः' करूनच कार्याला प्रारंभ करावा असे ठरविले व ओगल्यांना जाऊन भेटलो. मंडईजवळ जुन्या स्वस्तिक रबर कारखान्याच्या जागेतील काही भागात ओगल्यांचा छोटेखानी कारखाना आहे. स्वस्तिक कारखान्याचा हा मूळ ठिकाणा आणि आताचा खडकी स्टेशननजीकचा अनेक एकर पसरलेला कारखाना ह्यातील विरोध बघितला की गेल्या पंचवीस वर्षात वसंतराव वैद्यांनी 'स्वस्तिकचे' रबर किती ताणले हे लक्षात येते. प्रथम ओगल्यांच्या घिप्पाड कुत्र्याने भुंकून आम्ही आल्याची वर्दी दिली. नमस्कार चमत्कार झाले, नुकत्याच पार पडलेल्या लग्नासंबंधी उभयपक्षी मतप्रदर्शन झाले, पाहुणचार झाला आणि मी मूळ मुद्याला हात घातला. इंद्रायणी विद्यामंदिर ही संस्था तशी नवीन असली तरी तिचे ध्येय फार मोठे आहे वगैरे (आपले इथेच सांगतो, नाइलाज म्हणून मघून मघून येणारी ही फक्त माहिती आहे. आमच्या संस्थेची ओढून ताणून केलेली जाहिरात नव्हे) सांगितले. ओगले म्हणाले मी वसंतरावाना भेटतो. आपली कैफियत सांगतो आणि ते काय म्हणतात त्याची आपल्याला बातमी देतो. दुसरे दिवशी फोन केला तेव्हा ओगले म्हणाले 'दोन दिवस विचार करून काय ते सांगतो असे वसंतराव म्हणतात.' विचार करून बोलणारा प्राणी महाराष्ट्रात असू शकतो ह्यावर प्राध्यापकांत आणि साहित्यिकांत ज्याचा उभा जन्म गेला त्या माझा विश्वासच बसेना. दोन दिवसांनी ओगल्यांच्या वर कर्णपिशाच्च सोडले. ओगले म्हणाले,

"वसंतरावानी आज संध्याकाळी भेटायला बोलावले आहे."

वसंतराव त्यावेळी भाड्याच्या बंगल्यात रहात होते. त्यांचा 'लौकिक' बंगला—बंगला कसला राजवाडा - तयार झाला नव्हता. सजावट चांगली आणि किंमती होती पण का कुणास ठाऊक वाजवीपेक्षा थोडी अधिक वाटली. नुसतेच वसंतरावांच्याकडे पाहिले की दोन गोष्टी डोळ्यात भरतात. अगदी मधोमध नाकावर असणारा भांग आणि बरोबर नाकाखाली असणारा मिशीचा भुंगा. थोडी इकडे तिकडे नजर वळली की शंतनुराव किर्लोस्करांचा, स्वतंत्र आणि दोघांचा मिळून असे दोन फोटो दिसतात. एका गोष्टीची मजा वाटते की हे दोन 'राव' पुण्यात इतकी वर्षे असूनही त्यांचा 'साहेब' झाला नाही.

थोडी माझ्याबद्दल व गरीब इंद्रायणी विद्यामन्दिराबद्दल माहित दिल्यावर वसंतराव सभासद होण्याला तयार झाले.

"माझ्याबद्दल अपेक्षा काय आहेत ?"

"प्रत्येक महत्वाच्या व्यवहारात योग्य सल्ला देणे व मार्गदर्शन करणे" मी.

"ठीक आहे, पुढे."

"संस्थेच्या मदतीसाठी एखादा सार्वजनिक कार्यक्रम केला तर...

"तीन वर्षे १०००० रुपयाप्रमाणे जाहिराती मिळवून देईन,"

"आमची कारखानदार, व्यापारी वगैरे धनिकात ओळख नाही."

"ओळखी योग्य वेळी करून देईन. पण अमुक इतकी देणगी द्याच अशी गळ घालणे धोक्याचे असते. कारण याबाबतीत नेहमी साटेलोटे करावे लागते."

असेच आणखी बोलणे झाले आणि आमची पहिली मुलाखत संपली. पण पुढील प्रत्येक मुलाखत ही 'जगात कसे वागावे आणि कसे बोलावे' ह्याचे वस्तुपाठच होती. वसंतरावांच्या इतका टापटिपीचा, पद्धतशीर वृत्तीचा माणूस मी पाहिलाच नाही. कामाचा उरक आणि वेळाची बचत ह्याबाबतीत आम्ही हिंदी माणसे फार मागासलेली आहोत. उद्योगपति असोत, अधिकारी असोत, एकेकाचा दरबार असतो आणि कोणतेच काम धड होत नाही. मी वसंतरावांच्याकडे पहिला धडा शिकलो तो 'काळ काम वेगांच्या' गणिताचा. वसंतरावाना भेटावयाचे म्हणजे प्रथम 'काळ'



**श्री. वसंतराव वैद्य-सहकुटुंब सहपरिवार**

आ वासून पुढे उभा असतो. थोड्याच दिवसापूर्वीची गोष्ट. वसंतराव अमेरिकेहून परत येऊन दोन दिवसच झाले होते. एका सुप्रभाती मी मुंबईहून ट्रंक कॉल केला. 'या, पण फक्त मी अर्धा तास देऊ शकेन' असे उत्तर मिळाले. एक संध्याकाळचा सार्वजनिक समारंभ व रात्रीचे सार्वजनिक जेवण ह्यातील अर्ध्या ते पाऊण तासाचे मध्यंतरात माझी शेवटी भेट ठरली. त्यामुळे आपले 'काम' काय आहे हे विचारपूर्वक शिस्तीत करावे लागते. प्रत्येक मुद्दा हा अगोदर पक्का ठरवावा लागतो. त्यावरोबरच सगळ्या तपशिलाचा फौजफाटा तयार ठेवावा लागतो आणि हे सगळे कार्य विजेच्या 'वेगाने' आटोपावे लागते. ह्याचा अर्थ गलथानपणे, घाईघाईने कसे तरी असा नव्हे. उलट वसंतराव साधे चिटोरे किंवा टिकलीएवढा मुद्दा असला तरी त्याचा गंभीरपणे विचार करतात व मग मत देतात. त्यांच्याजवळ 'फुकाचे मुखी बोलणे' नाही. उलट ओढून ताणून आणलेल्या गांभीर्याचे चंद्रवळही नाही. अगदी वाङ्मयीन कसोटीला उतरणारा त्यांचा विनोद नसला तरी त्यांची विनोदबुद्धी धडधाकट आहे. त्यामुळे ह्या माणसाबद्दल आदर वाटतो पण संकोच वाटत नाही. फार जवळ जाता आले नाही तरी कधीही दुराव्याची दरी निर्माण होत नाही. एका निकटच्या मित्राचा मुलगा फार हुषार आहे. मुलाचे कौतुक करावयाचे पण त्यातच वापाला खेळकर कोपरखळी घ्यावयाची म्हणून वैद्य विचारतात, 'काय रे तू इतका हुषार कसा झालास ? आडात नसताना पोहऱ्यात कुठून आले ?' कधी कधी मनुष्यस्वभावाचे मार्मिक अवलोकन दर्शविणारी विनोद वैद्य करतात. सासूवाईच्या वाढदिवसानिमित्त बरेच आप्तमित्र जमले होते. कामाच्या गर्दीत व पाहुण्यांच्या गर्दीत त्यांची मेहुणी कुठेतरी बेपत्ता झाली होती. संशोधन चालू होते. 'इकडे असेल, तिकडे असेल, इकडे बघ, तिकडे बघ,' असे उद्गार निघत होते. वसंतराव मध्येच म्हणाले, 'तिच्या मुलाला चिमटा काढा. त्याचे भोकाड पसरले की आईसाहेब असतील तिथून धावत येतील. शाब्दिक कोटया करण्याचाही त्यांना नाद आहे. सकाळची न्याहारी घेत असताना चिरंजिवांनी तोंड वेडेवाकडे केले. 'काय झाले ?' वैद्यांचा प्रश्न.

'आलं.'

'कोण आलं?' तीर्थरूपांनी परत पृच्छा केली.

'आलं, आलं....'

'कळलं,' आणि न्याहारी संपली.

वैद्यांचा एक आवडता शब्द म्हणजे 'घोपटी'. ह्या शब्दप्रयोगामुळे प्रथम मी फारच बुचकळ्यात पडत असे. कारण त्यावेळी माझ्याजवळ पिशवी होती, पुढे वापरून गलितगात्र झालेली एका चामडी बॅग होती. काम संपवून जाण्यास उठलो की वैद्य हटकून विचारात, 'काय तुमची घोपटी घेतलीत का ?' मध्येच कागदपत्र लागले की म्हणत, 'तुमची घोपटी त्या टेवलावर आहे.' आपली चेष्टा तर करीत नाहीत म्हणून मी यांच्या चेहऱ्याकडे पाही पण तो निर्विकार असे. पुढे घराबाहेर पडताच किंवा घरात येताना वसंतराव नोकरास हटकून म्हणत, 'अरे माझी घोपटी कुठे आहे ?' तेव्हा माझा जीव भांड्यात पडला. माझी खात्री आहे उद्या राष्ट्रपति त्यांच्या बंगल्यावर आले (गेल्या वर्षी उपराष्ट्रपति म्हणून आले होते) आणि त्यांच्या हातात बॅग असली तर वैद्य हटकून पुढे हात करून म्हणतील, 'तुमची घोपटी इकडे द्या.'

एखाद्या साध्या प्रसंगामधून माणसाच्या चारित्र्याचे मनोज्ञ दर्शन घडते आणि त्याची आंतरिक ओळख पटते. इंद्रायणी विद्यामंदिराकरिता पैसा कसा उभारावा ह्याची विवंचना म्हणा, विचार म्हणा चालू असताना तळेगावच्या एका सार्वजनिक संस्थेच्या बऱ्याच मोठ्या जागेसंबंधी बोलणी सुरू झाली. संस्थेने आम्हाला किंमतीत सवलती दिल्या पण रक्कम आमच्या आवाक्याबाहेरची होती. जमीन विकत घ्यावी, प्लॉट्स् पाडून विकावी व मधला फायदा मिळवावा असा आम्हा काही जणाना स्फूर्तीचा झटका आला पण त्याला सक्त विरोध करणारे वैद्य होते. 'इट इज नॉट डन' – असे करणे अयोग्य अनैतिक होईल व संस्थेला तर मुळीच शोभणार नाही. कारण आपण जागेचे काय करणार हे न बोलता प्लॉट्स् पाडणार व विकणार. दुसरी संस्थाही आपल्याचसारखे पैसे मिळवू शकेल. वैद्यांच्याकडून योग्य मार्गदर्शन मिळते ते असे.

मोठेपण आले की आपली स्तुती व इतरेजनांची निंदा ऐकण्याची भूक अनावर होते. कुणी स्तुती करायला लागले की वैद्य ती झुरळाप्रमाणे झटकून टाकतात आणि कोणी निंदा करायला लागले की काकुळतीने विचारतात, 'त्या माणसाबद्दल माझे मला स्वतंत्र मत बनवू द्या. ते पूर्वग्रहदूषित करण्याचा प्रयत्न कां करता ? जगात बोलायला दुसरे विषय का कमी आहेत?'

वैद्यात जसा आंधळा अहंकार नाही तसाच नाटकी विनयही नाही. कै. स. गो. वर्वे ह्यांच्या निवडणुकीच्या निकालानंतरची गोष्ट. भेटताक्षणीच मी अभिनंदन केले व म्हणालो, 'ह्याचे श्रेय आपल्याला आहे. आपण दीड महिना मुंबईत ठाण मांडून बसलात म्हणून वर्वे निवडून आले.'

'खरे आहे. मी गेलो म्हणून, नाहीतर काय झाले असते सांगता येत नाही' आणि ह्या उत्तरातील अक्षरन् अक्षर खरे आहे. माणसाचे बळ, पैशाचे बळ आणि निवडणूक मोहिमेची योजनापूर्वक केलेली आखणी ही बाजू खंबीरपणे वसंतरावांनी सांभाळली. इतकेच नव्हे तर निवडणुकीखेरीज अन्य कोणत्याही विचाराचा स्पर्श त्यांनी ह्या काळात होऊ दिला नाही. 'ब्रह्म तेथे माया' ह्याप्रमाणे जेथे वर्वे तेथे वैद्य - पांच-सहा-तास सोडल्यास – अहोरात्र असत. दुर्दैवाने वर्वे गेले आणि त्यांच्या भगिनी सौ. ताराबाई सप्रे उभ्या राहिल्या. वसंतरावानी अमेरिकेचे प्रयाण तहकूब केले, परत घाटकोपरला ठाण मांडले आणि मेननसाहेबांना पाडले. तसा कॉंग्रेसचा आणि वैद्यांचा काहीही संबंध नाही. केवळ वर्वे ह्यांच्याबद्दल आदर

अनुक्रमणिका

आणि आपुलकी ह्यामुळे हे घडले. या माणसाच्या अंगातले सगळे गुण वरील तीन महिन्यांच्या काळात प्रकर्षाने प्रकट झाले. विटूमधून आजच्या स्वस्तिक कारखान्याचा जो सिंधू निर्माण केला आणि १९५२ साली मंदीमुळे ह्या सिंधूला लागलेली आर्थिक ओहोटी कशी थोपविली असेल त्याची कल्पना त्यानी निवडणुकीच्या लष्करच्या भाकरी भाजल्या त्यावरून पूर्ण येते.

मालकाचा मोठेपणा किंवा मालकाचा उणेपणा दाखविणारे मापनयंत्र म्हणजे त्यांचे नोकर. घरात आणि कारखान्यात मी वैद्यांना अनेकदा भेटतो आणि कधी कधी त्यांच्या नोकरांनाही भेटावे लागते. प्रत्येकाची वागणूक जितकी अदबशीर तितकीच अकृत्रिम असते. किंबहुना अकृत्रिमपणा हा वैद्य पतिपत्नींचा विशेष आहे. त्यामुळे विविध साधनांनी, सुखसोयींनी आणि वैभवाने नटलेल्या त्यांच्या बंगल्यामधील 'घरगुतीपणा' कायम आहे. काही बड्या माणसांच्या घरातील वातावरण इतके 'उच्च' असते की माणूसकीची हवा विरळ होत गेल्यामुळे आपण गुदमरतो. अगत्य म्हणजे काय हे 'लौकिक' बंगल्यातच बघावे. दोघातही तोंडपूजेपणा नाही. पण आलेल्या पाहुण्यांना खाण्याचा किंवा पेयाचा नैवेद्य दाखवून तोंडपूजा करण्यात हे जोडपे तत्पर असते. पाहुणचाराचा हा फक्त प्रारंभ. समारोपांती सुतोवाच वैद्य प्रथमच करतात. 'कसे आलात? वाहन ठेवलेत का सोडलेत?' विनोबा भाव्यांच्याप्रमाणे पदयात्रा करीत परत जाणार असाल तर तुमची गाडीमधून रवानगी होते. माझा एक अतिहुषार मित्र आहे. त्याचे मते हे उदाहरण वैद्यांच्या पाहुणचाराचे किंवा उदारपणाचे द्योतक नसून त्यात त्यांचे व्यवहारकौशल्य दिसते. समजा पाहुण्याने मुक्काम करावयाचा ठरविले तर काय करा? त्यापेक्षा 'पालखीपदस्थ' करून पाठविले बरे.'

वैद्यांच्या संभाषणात साहित्यिक किंवा इतर संदर्भ फार कमी येतात, जवळजवळ येतच नाहीत. आपला उद्योग सोडून इतर गोष्टीत वाजवीपेक्षा अधिक रस घेण्याचा खास मराठी बाणा त्यांच्यात नसावा. बाकी एक गोष्ट खरी की त्यामुळे 'बहुश्रुतता' ह्या द्रव्याचे वैद्यांच्या व्यक्तिमत्वात असणारे प्रमाण अल्प आहे. किंबहुना वैद्यांना 'साहित्यिक' या संस्थेबद्दल थोडा तिटकाराच असावा असा मला संशय आहे. एकदा बोलताना, 'तुम्ही साहित्यिक आहात का?' असा धोकेबाज

प्रश्न त्यानी मला विचारला. 'आहे पण चांगल्या अर्थाने' मी धूर्तपणे उत्तर दिले. चांगुलपणाचे व साहित्यिकांचे सख्य म्हणजे विळाभोपळ्याचे सख्य हे बहुधा उद्योगधंद्यात रममाण झालेल्या माणसाला कोठून कळणार ?

जयश्रीबाईना मात्र, आपले पतिराज खूप वाचतात, तसाच प्रसंग आल्यास अगोदर तयारी करून भाषण करतात, असे सकारण वाटते. ज्याला आपण सांस्कृतिक उद्योग किंवा धंदे म्हणतो म्हणजे नाटक, चित्रपट, गायन, नृत्य वगैरे त्यांचे या सुसंस्कृत माणसाला तितकेसे वेड नसावे असे वाटते. रांगणेकरांचे 'कुलवधु' नाटक वसन्तरावांचे आवडते नाटक होते. यावरून मराठी नाटके त्यानी फारशी बघितली नसावीत असा माझा तर्क आहे. वसंतरावाना नाटके बघण्याची हौस आहे. पण उद्योग जन्माचा झाल्यामुळे नाटक झाले जन्माचे हे घडले नाही. मराठी माणसाची खास दोन व्यसने म्हणजे नाटक आणि राजकारण ! नाटकाच्या राजकारणाची व राजकारणातील नाटचाची व नाटकीपणाची चर्चा करण्यात आमचा अर्धा जन्म जातो.

राजकारणाचा व तोसुद्धा ४२ च्या 'चलेजाव' राजकारणाचा फिक्कट टिळा वसंतरावाना कळत नकळत लागला आहे. पुण्यातील "कॅपिटॉल बाँब" कटाचा एक धागा थेट त्यांच्या खोलीपर्यंत भिडला होता. त्यामूळे त्याना पोलिस चौकीवर काही दिवस हेलपाटेही घालावे लागले होते.

वसंतरावानी धंद्यात एवढे यश मिळविल्यामुळे त्यांच्याबद्दल माझे दोन गैरसमज झाले होते. "लौकर निजे, लौकर उठे, त्याला आरोग्य संपत्ति भेटे" ह्या न्यायाने वैद्य लौकर उठत असावेत, हा एक. एकदा 'पंचपंच उष:काले' मी त्याना फोन केला. नंतर प्रत्यक्ष भेट झाल्यावर वसंतरावांनी आज्ञावजा विनंती केली की, "इतक्या लौकर फोन करू नका." जो कोणत्याहि क्षेत्रात मोठा होतो तो बाळपणी फार अभ्यास करतो अशी, माझी (मी 'प्राध्यापक' नामे प्राणी असल्यामुळे) समजूत होती. पण ओगल्यांनी हे माझ्या मनातले जळमट तावडतोब दूर केले. वसंतराव कॉलेजमध्ये असताना अभ्यास करीत नसत असे नाही. पण परीक्षेपूर्वी दोन महिने ते आपले 'अंदाजपत्रक' तयार करीत. मागील पांचसहा वर्षांचे पेपर्स गोळा करावयाचे व त्यावरून परीक्षेत येणाऱ्या संभाव्य प्रश्नांचा अंदाज करावयाचा. हे अंदाज सहसा चुकले नाहीत. आज मात्र वैद्य अंदाजापेक्षा आयोजनाबद्दल प्रसिद्ध आहेत. वेळ, पैसा, श्रम ह्यापैकी काहीही फुकट जाता उपयोगी नाही हा वैद्यांचा कटाक्ष असतो. अमेरिकेत गेले तेव्हाच ह्या विद्यार्थ्यांने आपण खराच्या वस्तू तयार करण्याचा प्रचंड कारखाना काढावयाचा हे ठरविले. परीक्षा देताक्षणीच कोणती यंत्रे विकत घ्यावयाची ती निवडली. हिंदुस्तानात येऊन पैशाची जुळवाजुळव केली आणि यंत्रसामुग्री खरेदी केली. बंगला बांधताना हाच प्रकार. जवळ जवळ १०–१५ वर्षे 'अवलोकन' चालू होते. त्यामुळे 'घर पहावे बांधून' ह्या वाक्प्रचरातील पस्तावा त्यांना कधीच झाला नाही. फक्त एकच घोटाळा झाला. मुळीच विश्वास ठेऊ नये, अशा पुण्याच्या वेधशाळेवर विश्वास ठेवला. वाराही महिने वारे कसे वाहतात ह्याबद्दल वेधशाळेतील अनेक वर्षाच्या नोंदी बघून घर बांधले पण नेमक्या त्याच खोल्यात गुदमरायची वेळ येते.

'लग्न पहावे करून' ह्यात मात्र वसंतरावांनी आपल्याच 'आतल्या आवाजावर' विश्वास ठेवल्यामुळे त्यास १०० टक्के यश आले. विद्यार्थीदशेतच आपली बायको कशी असावी व कोण असावीहे वसंतरावानी ठरविले. आपल्याच मित्राच्या (कर्वे) बहिणीची—जयश्रीबाईंची—त्यांनी निवड केली. चंद्र, तारे, फुले, पक्षी यांची कुमक घेऊन प्रेमपत्रे लिहिण्याऐवजी ह्या 'अरसिक' माणसाने आपली वायको म्हणून

( पृष्ठ ५८ वर पहा )

अनुक्रमणिका










स्वप्ने पडतात ना, तसे हे कवि आयुष्यात येतात व जातात. आल्यावर हरखून जाऊ नये. गेल्यावर कळवळू नये. मनानं कसं धीरगंभीर असलं पाहिजे....कळत पण वळत नाही....

# मी कवि आणि प्रेयसी

—श्रीकांत पुरोहित

**मस्टरवर** सही करून मी माझ्या जागेवर येऊन बसलो. एक सुटकेचा श्वास टाकला. प्यूनला पंखा सुरू करायला सांगितला. आज तरी मी तांबड्या लेट-मार्क-क्रॉसचा धनी झालो नव्हतो. ते तांबडे क्रॉस मिळविण्याच्या बाबतीत उभ्या ऑफिसात माझा विक्रम होता. आज प्रथमतःच उशीर झाला असतानाहि वाटेत आलेल्या सर्व अडचणींना व्यवस्थित दूर सारीत मी ऑफिसमध्ये वेळेवर येऊन पोहोचलो होतो. एरवी घरून निघायला उशीर झाला, कुणी रस्त्यात भेटले, बस चुकली की मला लेटमार्क व्हायचा हे काळ्या दगडावरील पांढऱ्या रेषेइतके निश्चित ठरलेले होते. आज मात्र मी ऑफिसला उशीर होऊ नये म्हणून भलतीच धावपळ केली होती. माझ्यात हल्ली वेळोवेळी डोकावणारे धावपळीचे कसब पाहिले म्हणजे एक विचार नेहमीच लता काळेसारखा माझ्या मनात येतो.

(लता काळे: आमच्या तुंदिलतनु घरमालकाची कृष्णसांवली 'सु'कन्या ! या ना त्या कारणाने माझ्याकडे येते) शाळेत असताना माझ्या अंगातल्या या धावण्याच्या कसवाने कुठे दडी मारली होती कुणास ठाऊक ! का त्या वेळेस आमची ही कला असहकाराच्या चळवळीत गुंतली होती कोण जाणे. (सहकार्य मी मागितले तेव्हा कॉलेजातल्या कला चित्रेने मात्र माझ्याशी असहकार केला होता. फार जुनी कथा आहे ती.)

आज सकाळी उठल्यावर कुणाचे तोंड पाहिले होते कुणास ठाऊक !

जेवून उठल्यावर बसच्या रांगेत उभा राहाण्यासाठी बाहेर पडलो तेव्हा मात्र मंदा लचकेचे दर्शन घडले.

आपले उठबस प्रदर्शन मांडणे हा तिचा अत्यंत आवडता छंद आहे. तसेच अधूनमधून लोकाना नको असले तरी आपले दर्शन आपणहून घडवून देणे हा तिचा नेहमीचा उद्योग आहे. . .



जीवनात ती काय काय घडविणार आहे ? किती अन् कसले उद्योग करणार आहे हे एक त्या आकाशातल्या देवालाच ठाऊक ! उंचावर राहतो बेटा. जागेला तिथे तोटा नाही. कुणावरहि लक्ष ठेवायला सोपे पडते. शिवाय स्वर्गात काय किंवा भूतलावर काय देवांना नोकरी व पोटासाठी उद्योग करावा लागल्याची माहिती कुणाच्याहि ऐकिवात नाही. स्वर्गात इंद्राचे नंदनवन आहे. भूतलावर देवळे, आश्रम. चैन असते बेटयाची !

आम्हालाच माणसाचा जन्म कां यावा? एक त्रस्त करणारा प्रश्न !

सद्‌ गोरेसारखा !

ऐन पंचविशीत सुंदर सुंदर पोरीन्‌-बरोबर हिंडला अन्‌ गळयात पडली ती पत्नी यथातथा ! गळयात पडली म्हणून पत्नी म्हणायची.

एरवी सौंदर्याचा गळा कापलेली कुब्जा !

सांगायचं कारण ती बया रस्त्यात भेटली.

मी घाईत होतो. मी घाईत नसलो, तरीही मी नेहमीच घाईचा आव आणतो असं तिचं म्हणणं आहे. एकंदरीत तिचं म्हणणं खरंच असतं; पण त्याला मी काही तूप घालीत नाही. फट्‌ म्हणता अस्मादिकांची 'आहुति' पडायची.

—तर मी होतो घाईत अन्‌ ती कामगिरी-वर ! तसं पाहिलं तर ती रिकामटेकडी आहे अन्‌ नाहीहि ! गेली कित्येक वर्षे तिला एस्‌एस्‌सीच्या मांडवाखालून जावं लागतं आहे. तिची आई फक्त तिला 'एकाच' मांडवाखालून पाठवायला उत्सुक आहे, पण कितीतरी कारणांमुळे 'मांडवपरतणी'चा योग काही येत नाही. 'नेमेचि येतो मग पावसाळा' या न्यायाने येणाऱ्या अप-यशामुळे ती स्वतःला नानाविध गोष्टींत गुंतवून घेते. समोरून ती येऊ लागली तेव्हा माझा रोख मी किंचित्‌ बदलला. झपाटयाने तिला टाळून मी पुढे निघालो. त्या विचारात भराभर पावले उचलली. फक्त 'असले'च हेतु जाणण्यात पारंगत मंदा लचकेने स्वतःचं मन अन्‌ पावलं माझ्यापेक्षा जलदगतीनं चालविली.

माझा बेत फसला. समीप येत, हाताच्या नृत्याबरोबर साऱ्या शरिराला गोड झोका देत ती विचारू लागली,

"मला चुकवता काय ?"

"चुकता आहात तुम्ही."

"मी नाही, तुम्हीच. मी लगेच ओळ-खलं मला पाहिल्यावर तुमच्या मनात काय आलं ते."

"अरे बापरे ! म्हणजे पुढच्या वेळेपासून मला मन घरीच ठेवून बाहेर पडायला हवं. कारण मन बरोबर असलं म्हणजे तिथं कसले ना कसले विचार चालूच राहणार अन्‌ मग तुम्ही भेटलात म्हणजे संपलंच सारं...... माझा...."

"नको ! नको ! त्यापेक्षा मी मन बरोबरच वाळगीन."

"कां ?"

"नाही आपलं उगीच."

"मी मात्र आता तुम्हाला उगीच थांबवलं नाही हो !"

"अस्सं ! हा बदल केव्हापासून झाला तुमच्यात ?"

"म्हणजे पूर्वी मी तुम्हाला कारणाशिवाय उगीच थांबवित होते वाटतं. . . "

"गैरसमज किती चटकन्‌ करून घेता हो !"

"जाऊ दे बाई !"

"ही कुठली बाई काढलीत मध्ये..."

"अहो, बाईला नाही मी काही म्हणाले. या वादविवादाला जाऊ दे म्हणाले !"

"मग हरकत नाही काही !"

"ओळखा पाहू मी कां थांबवलं तुम्हाला ?"

"मला ओळखण्याची कला येत असती ना, तर तुमच्या मनातला मला थांबवि-ण्याच्या हेतूपेक्षा मी शब्दरंजन स्पर्धेचं उत्तर ओळखलं असतं."

"चल्ला ! स्वार्थी कुठचे !"

"कोण मी ?"

तिच्या लाडिक बोलण्यात वेडावण्याची भर पडली. . .

"नाहीतर कोण मी ?"

"लवकर ! मला ऑफिस आहे."

"आम्हाला जसा काही उद्योगच नाही...'

"तुम्हाला खूप उद्योग असतील, पण माझा हा एक पोटापाण्याचा उद्योग मला नको जीव करतो..."

"माझं महत्वाचं काम आहे तुमच्या-कडे..."

"हे महत्त्वाचं काम लवकर कां सांगीत नाही तुम्ही मला..."

"इथं रस्त्यात का सांगू ?"

"मग कुठे सांगणार ते आता ?"

"एका बाजूला. . . . "

"ही एक बाजू या गर्दीच्या रस्त्यात अशक्य आहे. मी रस्ता सुधारतो कसा ! उशीर होतो आहे..."

"आता फक्त पांचच मिनिटे !"

तिची आडवणूक फक्त आणखी पांच मिनिटांपुरती आहे, हे समजल्यावर मला थोडासा धीर आला: पांच मिनिटांत मी सुटणार होतो.

समोर बसच्या रांगेत उभा असलेल्या एका तरुणाकडे बोट दाखवून ती विचारू लागली, "तो तरुण पाहिलात का ?"

"कुठला ? बुशकोटवर हत्ती, घोडे काढलेला. . . ."

"छे ! हो. असं काय करता. मवाली नाही काही तो."

"हत्ती, घोडे काढलेले बुशकोट वापर-णारे सारेच लोक मावली असतात वाटतं?"

"तसंच नाही, पण बरेचसे. . . ."

"हे पहा, असलं धाडसी विधान कर-ताना पूर्ण विचार करावा." मी पुरुष जातीचा कैवार घेत तिच्यावर तुटून पडलो...

"नॉयलॉनच्या झिरझिरीत साडया. अंगप्रत्यंगाचं उन्मादक, अल्प पण उघडं दर्शन... त्यावरची विविध डिझाइन्सची छपाई... तुम्हाला काय म्हणायचं, आम्ही? सुचवता एखादा असला शब्द ?"

"चुकले बाई ! पण लॉरीसारखे कर्ण-कटू हॉर्न वाजवीत असं अंगावर काय हो येता एकदम् ?"

"अंगावर कुठे आलो मी ? तुमच्या-पासून चांगला हातभर दूर रस्त्यावर उभा आहे."

"पुरे तुमची विट्.. किनई तर मी काय सांगत होते बरं ?

"तुम्ही माझी लॉरी केली त्याची गोष्ट. . ."

"इतकी काही माझ्या आयडियेची टिंगल करायला नको म्हटलं.... नव-काव्यातल्या कल्पनेपेक्षा कितीतरी चांगली आहे ती. तर तो समोर उभा आहे ना गोरा.... सुंदर तरुण..."

"रस्त्यातून जाताना मला पुरुष कधी सुंदर दिसतच नाही..."

"किती बोलता ? माझं ऐकणार का ....."

"काय कथाभागच ना ?"

"हो पुराणिक आहे मी कथा सांगायला ... पैसे, फळं कथा संपल्यावर ठेवायला विसरू नका हं..."

"माझ्या विनोदाला येणारी ही फळं पाहून मात्र माझा चेहरा पुराणाला बसलेल्या म्हाताऱ्या आजीसारखा झाला."

"तो तरुण हल्ली आमच्यासमोर राहणाऱ्या दरवडघांच्या ब्लॉकमध्ये राह्यला आलाय्. समोरच्या गॅलरीत तासन्-तास उभा असतो. कधी क्षितिज न्याहाळीत, कधी आकाशावर नजर लावून, कधी माझ्याकडे बघत... माझ्याकडे पाहताना त्याचे काळेभोर डोळे भावातं गाणे म्हणत आहेत—असा भास होतो... कधी मजेत असला म्हणजे शीळ वाजवतो, गोड हंसतो... कधी कधी दिवसभर तन्मय होऊन ओठातल्या ओठात काहीतरी गुणगुणत गॅलरीभर फेऱ्या घालतो. पण रोख कुठंहि असला तरी नजर मात्र हलकेच माझा शोध घेत असते. अगदी घारीसारखा आहे...खरं तर तो खारीसारखा लाजरा अन् संकोची आहे... धीटपणा कसा तो नाहीच अगदी. नजर वारंवार माझ्यावर असते म्हणून त्याला घारीसारखा म्हणाले. एरवी नुसता खार आहे... भित्रा..लाजाळू."

"मोठा हुशार दरवडेखोर दिसतोय् लेकाचा."

"भलतंच काय बोलता हो एखाद्याविषयी ? दरवडा कशाला अन् कुठं घालणार तो ?"



"तुझ्यासारखं रत्न शोधूनहि मिळायचं नाही त्याला. जोक नाही. सौंदर्याचा षौक आहे, पारख आहे म्हणून सांगतो."

"पुरे हं ! हरबरा मुंबईत वाण्याकडे विकत मिळतो. शहरात हरबऱ्याची झाडं नाहीत म्हटलं महाशय."

"मग तुला मनाच्या झाडावर पांखरासारखा उडून घेऊन बसलेला तो सुंदर तरुण आहे तरी कोण ?"

"कवि !"

"अगदी नवा का ?"

"हो."

"नवा कवि ऽ !"

"असं ओरडता कां ? कवि इतके भयंकर असतात की काय ? की त्याचं नांव ऐकल्यावर लोकांचा कंठ खुला व्हावा..."

"भयंकर ! अहो, कवि म्हटला की संपलच सारं."

"संपताय् कुठं आता ? आताच तर कुठं सुरवात झाली आहे."

"कशाला ?"

"इश्श, मी ते कसं सांगू हो !"

"ऐकण्यासारखं नसेल तर राहू द्या."

"ऐकण्यासारखी खास आहे. पण ऐकविण्यासारखी नाही !"

"बरं राहू द्या नकाच सांगू !"

"नाही. सांगतेच."

"बरं सांगा !"

"प्रत्येक व्यक्तीच्या मनात काही गोड स्वप्निल कल्पना रूजलेल्या असतात. त्यांचा वेडा पाठलाग करायची त्याच्यात एक जबरदस्त छुपी इर्षा असते. माझी फार इच्छा होती. कुणातरी कवीशी आपली मैत्री व्हावी. दाट अगदी चांदणं पडतं ना तशी. कवि कितीहि उपेक्षित जात असली तरी ती मला भलतीच आवडते. मी त्या जातीची नाही. अगदी त्याच्या पोटजातीतलीहि नाही तरी मला फार वाटतं. ह्या जातीतल्याशी ओळख व्हावी, कवीच्या पोटात नाही तरी निदान गोटात तरी शिरावं, स्नेहसंबंध जडावा. कवि हळवे असतात, भावनाप्रधान असतात. माणसातले मानव्य, माणुसकी ती सारी आढळली तर त्यांच्याजवळ आढळते. या जंगात माणसाला माणूस म्हणून जगवणारी मन ही अनमोल चीज त्यांच्याजवळ असते. जी पूर्वी अस्तित्वात होती हल्ली ती आढळत नाही. अस्तित्वात असलेली पण ज्ञात नसलेली ! दृष्टीस न पडणारी अमेरिका जशी कोलंबसनं शोधून काढली अगदी तसेच मी करणार आहे."

अगदी अमेरिका नाही आफ्रिका शोधून काढा; पण माझ्याशी बोलायला ही कुठली वेळ शोधून काढलीत ? ही वेळ मुंबापुरीत पोटासाठी ऑफिसला जाण्याची असते, खेड्यात गुरं चरायला जाताना त्याना वेळेचं बंधन नसतं, पण इथं तो प्रकार नाही. प्रथम वेळ साधावी लागते; नाहीतर वेळ ओढवते...."

"सदान्कदा ऑफिस, वेळ... टाईम टेबल... गुलामगिरीची पकड किती घट्ट आहे हो तुम्हा पुरुषांवर हल्ली..."

"आहे खरी. शाळेत असताना आईच काय, मास्तरहि आम्हाला 'गुलाम' म्हणत होते... मोठा झालो तेव्हा एफ्. वाय् ला फिश्-पॉंड देताना शैला देवघरने मला 'बदामचा गुलाम' ही पदवी वहाल केली... त्याकाळी या गुलामांचे राज्य सुखवैभवात सुरळीत चाललं होतं... हल्ली नोकरीचा गुलाम झाल्यापासून मात्र सारा जमाना बदलला आणि कालपरत्वे हल्ली पुरुषाला, नोकरीची, परिस्थितीची, क्वचित लग्न झाल्यावर पत्नीची गुलामगिरी पत्करावी लागते..."

"बिच्चारे !"

"मला सहानुभूति दाखवता ?"

"छे, फक्त तुम्हालाच नाही. समस्त पुरुष जातीला. तो समोर उभा आहे ना तरुण, त्याची सुद्धा कधी कधी मला कणव येते. त्याच्या नेहरू सद्रयाला कधी डाग पडलेले असतात. इस्त्री उडालेली असते. कधी कधी त्याला अस्वस्थ झालेलं पाहिलं म्हणजे वाटतं, ती दरवडचाची बायको आहे कजाग. ती कुठली लक्ष देणार त्याच्याकडे. किती आबाळ होत असेल. किती त्रास अन् गैरसोय होत असेल

विचाऱ्याची. जेवायला तरी वेळेवर मिळतं की नाही कोण जाणे. एवढा मोठा कवी आपल्याकडे राहतो याची मेलीला दादच नाही. सबंध बिल्डिंग तिच्या नांवानं ओरडत असते, पण प्रत्यक्ष नवऱ्याला दाद न देणारी बाई ती... मी असते तर..." (ओठ चावते)

"कां थांबलात ? अन दांतओठसे खाल्लेत . . .त्या बाईला तुमच्यापासून काही धोका निर्माण नाही ना झालेला ?"

"मी ओठ चावला. खाल्ला नाही. बोलू नये ते मनातलं बोललं गेलं की मुलीना जे वाटतं त्याला लाज म्हणतात. मी लाजले वरं.... पण ते जाऊ द्या... त्या दरवड्याच्या बायकोची एकाएकी काळजीशी वाटू लागली... काय विचार आहे ?"

"मी ठीक विचार करतो आहे. पण तुम्हाला त्या तरुणाविषयी एकाएकी जे काही वाटू लागलय् ते विचार करूनच वाटतंय् ना ? कारण लाज काय कायशी मुलींना वाटली ना, म्हणजे अविचाराकडे त्यांची पावलं वळू लागली—म्हणून समजावं असं म्हणतात..."

"आणखी नाही का काही म्हणत.."

"म्हणतात की सांगू..."

"नको !"

"तुम्ही मला महत्वाच्या कामासाठी थांबवलं होतंत. त्या कामाचं काय झालं?"

"माझं काम झालं !"

"केव्हा मला न सांगताच ?"

"गॅलरीत उभं असताना त्याच्याकडे असं मोकळेपणाने पाहाता येत नाही. आजूबाजूला माणसं असतात. विनय नसला तरी नाटकी क्वचित् उसना आणावा लागतो... शिवाय मत्सर हा पुरुषाचा निकटवर्ति मित्र आहे. आज मी तुमच्याशी त्याच्यासमोर एवढं बोलले हे पाहून त्याला चांगलंच मीठ झोंबलं. तो माझ्यावर अधिक लक्ष केंद्रित करील. माझ्याकडे अधिक आकर्षित होईल. खूप दिवस संधि शोधत होते. आज योग आला. तो बसच्या रांगेत उभा राहचला अन् तुम्ही समोरून यायला एकच गांठ पडली. संधि आली की बससारखी पकडावी, साधावी."

"पण माझी बस चुकली त्याचं काय?"

"एक चुकली तरी दुसरी येईल की आता."

"अच्छा !"

"बाय बाय !"

"एक मिनीट हं !"

"आता काय राहलं ?"

"आणखी एक काम आहे तुमच्याकडे. फोन करून सांगेन..." वाक्य संपताच ऋणकोसारखी ती नाहीशी झाली.

मी ऑफिसला निघालो....

घरातून नऊ-दहाला निघाल्यापासून ते ऑफिसमध्ये दहा-पंचवीसला पोहचेपर्यंत घडलेला हा साग्रसंगीत प्रसंग मी पुनः पुन्हा आठवीत आश्चर्य करीत होतो. आज मला ऑफिसला यायला उशीर कसा झाला नाही ? त्या बयेशी पुऱ्या अर्घा तास गप्पा हाणल्या. मग रांग पकडली. रोज

मध्येच एखादे पांच मिनिटं काम उद्‌भवलं की उशीर होतो. अन् आज अर्धा तास वाया घालवून मी ऑफिस वेळेवर गांठलं ... कम्माल आहे... (शाली जोशीची पेटंट फ्रेझ !)

मी स्वतःला थोडासा हुशार समजत होतो. मंदा लचकेला माझ्यापेक्षा हुषारीत मी आजवर नेहमीच कमी गुण देत होतो; पण आज नकळत ती गुणाने माझ्या वरचढ ठरली होती. पहाता पाहता तिनं मला बनवलं, खेळवलं. शेवटपर्यंत मनातल्या गुप्त हेतूचा पत्ता लागू दिला नाही. मी शुद्ध 'फूल' होऊन तिच्याशी वेळ खर्चून थापा मारल्या (वंड्या जोगळेकर पैसे खर्च करतो. वेडा.) अन् शेवटी तिनं खुलाशाच्या गौप्य-स्फोटानं मला चांगलाच हादरा दिला. स्त्रिया हेतु साधण्याकरिता काहीही करतील हे माझ्या मित्राचं अनुभव-प्रुफ वाक्य आठवलं.....

ऑफिसमधले माझे इतर सहकारी कामाला (म्हणजे आपापल्या आवडत्या उद्योगांना) लागले. मी गप्प होतो. विचारात बुडून गेलो होतो. जंबूच्या मानेचा भोवरा गरगर फिरू लागला होता. सदा मॅंडसे काल पाहिलेल्या एका आंग्ल चित्रपटाचं चित्तथरारक कथानक चित्तवेधक सुरेखा काळेला रंगवून सांगत होता.

गजा मराठे नव्या मैत्रिणीला प्रेमपत्र लिहीत होता. एक इंग्लिश कविता (तिच्यावर केलेली) तिला पाठविणार ही गुप्त बातमी त्यानं कलिगची पेन्सिल सहज उचलावी तशी त्याला सांगून टाकली.

अरुण पांडव मिस् फाटकला देण्यासाठी आणलेल्या रावळगाव टॉफीज मोजत होता. तोंडात सदान्‌कदा येणारे इंटरचे लॉजिक मनातल्या मनात वारंवार विसरत काही गोड काव्यमय कल्पना, विनोद खटपटीनं जुळवीत बसला होता. तरच दुपारी तिच्याशी बोलताना याची आज डाळ शिजणार होती. मागच्या प्रकरणात केवळ त्याच इंटर-लॉजिकच्या गप्पामुळे त्याच्या प्रेमाचं इंण्टरव्हल् झालं होतं.

देव फोनची आतुरतेनं वाट बघत होता. कानडे कामानिमित्ताने इकडे तिकडे हिंडत होता. दडे ओरडा आरडा करीत कामाचा देखावा करीत होते...

"पुरे हं ! हा काय शिष्टपणा !" काही 'आर. ए.' चे आवाज...

फोन माझ्याजवळचा आहे. कजाग बायकोपेक्षा त्याचा त्रास अधिक. सारखी कॉल बेल... हॅलो... ऑपरेटरची शिसारी. बसलेले गोड बोल... (भिडेला ते आंबट-गोड वाटतात.) मला कडू ! काही कडवट अनुभव आलेला नाही....

फोन सारखा वाजू लागला. प्यून कुठल्या तरी भयंकर महत्वाच्या कामात गुंतला होता. अखेरीस कटकटीला कंटाळून मी फोन उचलला अन् खरी खटकट सुरू झाली..

'हॅलो... कोण बोलतंय् ?"

"तुम्हाला कोण पाहिजे सांगा..."

"तुम्हीच !"

"मी ? पण तुमचं नांव काय ?"

"इश्श ! आवाज जसा काही तुमच्या ओळखीचा नाहीच !"

"इश्श हा आवाज माझ्या चांगलाच परिचयाचा आहे हो. पण अडचण अशी की हा 'इश्श' सर्वच बायका 'वापरतात' तुम्ही त्यापैकी कोण ?..."

"मी मंदा लचके नाही का !"

"तुम्ही मला माहित आहात. मंदा लचकेहि तुम्हीच असाल. पण फोनवर तुम्हीच आहात, हे कसं ओळखायचं मी ?"

"मग मी कसा ओळखला तुमचा आवाज !"

"तुम्ही तशा शहाण्या आहात !"

"काय म्हणालात ?..."

"काही नाही. हुशारी सांगणारा चतुर शब्द वापरला मी."

"मी किनई फार दुःखात आहे..."

"आवाजावरून वाटत नाही. शिवाय आतापर्यंतच्या बोलण्यातून सुद्धा दुःखाचा वास कुठे आढळला नाही."

"इश्श ! दुःख म्हणजे काय माझ्या वेणीतसा फुलांचा गजरा आहे होय वास यायला."

"तुमच्या डोक्यात मी गजरा पाहिला नाही कधी."

"जागा नसते. फार महत्त्वाच्या गोष्टी आहेत सध्या माझ्या डोक्यात. पण काय सांगू ! आता कसं हे सारं जीवन नीरस अन् बेचव वाटू लागलय्. जर सुखस्वप्न साकार होणार नसतील तर मेली छळतात कशाला कोण जाणे."

"चार तासापूर्वी सकाळी भेटलात तेव्हा आनंदात होतात की !"

"तिथूनच दुःखाला सुरवात झाली. आता वाटतं, तुम्हाला सकाळी थांबवलं नसतं तर फार बरं झालं असतं. मी तुमच्याशी बोलत उभी राहिले अन् त्याच्या कविमनाला धक्का बसला. माझ्याकडे पाहून त्यांना कविता सुचत होत्या. अलिकडे माझ्यावर त्यांचं प्रेम बसू लागलं होतं. मी तुमच्याशी विशेष सलगीनं बोलते हे पाहून त्यांनी भलताच गैरसमज करून घेतला. मी तुमच्यावर प्रेम करते या ग्रहानं त्रासून जाऊन त्यानी मला पाहिलं अन् अखेरचं प्रेमपत्र हॅंडडिलिव्हरीनं पाठवलं... त्यात आपलं तुझ्यावर प्रेम होतं; पण आपली निराशा झाल्यानं मी कुठंतरी दूरदूर निघून जात आहे, हा हृदयस्पर्शी मजकूर लिहिलेला होता. त्या पत्रावर आतापर्यंत मी अश्रुविमोचन करीत बसले होते. आता डोक्यात आलं. तुम्हाला फोन करावा. सारा प्रकार तुमच्या कानावर घालून तुमची मदत घ्यावी.... कराल मला मदत? लावाल त्यांचा शोध ?"

त्याचा शोध लावणं म्हणजे एकपरीने स्वतःच स्वतःची वाट लावण्यासारखं होतं... मी कुणी संत नव्हतो. माझा केवळ स्वार्थासाठी उपयोग करून घेणाऱ्या 'सबल अबले'वर ओढवलेल्या प्रसंगानं मी काहीसा सुखावलो...

"हे पहा मिस् लचके ! आता फार उशीर झालाय्.... तुमचा तो कविमहाशय डोक्यात राख घालून एव्हाना गौरीशंकरावर क्वचित चंद्रावर जाऊन पोहोचला असेल. साऱ्या कवींजवळ आवेग असतो. उत्कटता असते, त्या धुंदीत ते कुठं जाऊन पोहोचतील त्याचा नेम नसतो. अन् शिवाय कवि लहरी असतात. पूर्वी तुझ्याबद्दल वाटणारी त्यांची ओढ उद्या राहीलच असे नाही. स्वप्न पडतात ना, तसे हे कवि आयुष्यात येतात–अन् जातात. आल्यावर हरखून जाऊ नये, गेल्यावर कळवळू नये. मुलींनी कसं धीर-गांभीर्यं अंगी बाणलं पाहिजे.

"इतःपर तुम्हाला चिवटपणे अन् आशेने त्यांचा शोध करायचा असल्यास माझी मदत मिळणार नाही. पोरीच्या प्रेमाच्या भाकऱ्या भाजणं मला माझ्या गुरूनं शिकवलं नाही. माझंहि तुमच्यावर असंच फार मोठं प्रेम होतं, पण सकाळी तुम्ही कवीबद्दल तुमची ओढ बोलून दाखवलीत तेव्हाच मला कळलं, आता फार उशीर झालाय्. तुम्हालाहि सांगतो, तुम्हाला देखील असाच फार उशीर झालाय्. आता माझी मदत मिळणार नाही. नमस्ते."

पुढं तिचं बोलणं, प्रतिक्रिया न ऐकताच मी धाडकन् फोन खाली ठेवला.

● ● ●












# सहस्र सूर्यांची झळाळी

—हरिहर उर्सेकर

***'संकृत-पंडित' ओपेनहेमरने १९३८ साली अणुबॉंबचा चांचणी स्फोट यशस्वी केला. त्यावेळी उसळलेल्या तेजामुळे त्याला गीतेतील 'दीप्ती'चे वर्णन आठवले. तोच श्लोक त्याच्या मुखातून बाहेर पडला. पण आज तेच तेज अंधःकार बनू पहात आहे. हाही एक अजब दैवीदुर्विलासच !***

१६ जुलै १९४५ हा दिवस मानवी इतिहासात सुवर्णाक्षरांनी लिहिला जाणार की रक्तरंजित रेखानी ? आज अचूक भविष्य करणे कठीण आहे. त्या दिवशी पहाटे ५–३० वाजता जगातील पहिल्या अणुबॉंबचा चांचणी स्फोट न्युमेक्सीकोमधील लॉस अलामोस येथे करण्यात आला. चाळीस हजार फूटांपर्यंत धूम-ज्योती अंतराळ भेदून वर उठली. ते दैदीप्यमान दृश्य पाहून ओपेनहेमर या जर्मन शास्त्रज्ञाला प्रथमदर्शनी गीतेतील "दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुस्थिता । यदि भाः सदृशी सा स्याद्भा-सस्तस्य महात्मनः।।" या वर्णनाची आठवण झाली. हजार सूर्यांची दीप्ति, जणु काही विज्ञान विजयाची तेजोमय पताका!

या अण्वस्त्राचा जन्म अणुविच्छेदातून झाला. हा अणु म्हणजे काय प्रकरण आहे, ते पहाण्यासारखे आहे. विश्वातील वस्तूंची जडण-घडण समजून घेण्याबद्दल मानवाला प्राचीन कालापासून उत्सुकता होती. सुमारे अडीच हजार वर्षांपूर्वी हिंदुस्थानात बुद्धाचा उदय झाला. त्या सुमारास डेमोक्रीटस या ग्रीक पंडिताने अट्मस (Atomus) हा शब्द सर्वसूक्ष्म व अभेद्य कणांचे वर्णन करताना प्रथम वापरला. त्याचे मते, "जगातील पदार्थ सूक्ष्म अभेद्य अणूंचे बनवले आहेत. मीठ पाण्यात टाकले की ते विरघळून पाण्याशी एकजीव होते तेव्हा ते अशा सूक्ष्म सांद्र कणांचेच बनले असले पाहिजे." त्यानंतर ॲरिस्टॉटल् (३८४ खि. पू.) या विश्वविख्यात ग्रीक पंडिताच्या मताचा पगडा सुमारे २००० वर्षेपर्यंत मानवी मनावर होता. अणुचे अस्तित्व ॲरिस्टॉटल्ला मान्य नव्हते. पदार्थांचे फक्त चार प्रकारचे वर्गीकरण त्याने केले होते–उष्ण, थंड, ओले व कोरडे.

सतराव्या शतकात ग्रासाँदि या फ्रेंच वैज्ञानिकाने अणुबद्दल नवीनच सिद्धान्त मांडला. तो म्हणे, पदार्थ हे अणूंचे बनले आहेत व ते अणुकण एकमेकांशी कसल्या तरी रूपाने निगडीत झाले आहेत. लोहचुंबकीय आकर्षणाने बद्ध झाल्याने आपल्यास ते अणु-पदार्थ एकसंधी दिसतात. त्याच शतकात इंग्लडमधे न्युटनने पदार्थ हे प्रकाशाप्रमाणे वहाणाऱ्या कणांचे बनले आहेत असे प्रतिपादिले.

## सृष्टीतील मूलतत्वांची कल्पना

या बाबतीत महत्वाचा–संबधित–विचार म्हणजे सृष्टीतील मूलतत्वांची (elements) कल्पना. एक उपनिषदीय कल्पना अशी आहे की, 'आपो वै इदमासी'त प्रथम सृष्टी जलमय होती. छांदोग्य उपनिषदात असे वर्णन आहे की तेज, आप, पृथ्वी ह्या अनुक्रमाने मूलतत्वे सृष्टीत निर्माण झाली. सृष्टपदार्थांचे वायुरुप, द्रवरुप व घनरुप हे त्रिविध वर्गीकरण आधुनिक शास्त्रज्ञानीही मान्य केले आहे. नंतर यातील मूलतत्वात वायु व आकाशांची भर पडून पंचमहाभूते झाली. कणादमुनींचे मताने पदार्थ अणुमय आहेत.

मूलतत्वांची कल्पना अशी आहे की, ती दुसऱ्या कोणत्याहि पदार्थापासून तयार करता येणार नाहीत. तर नैसर्गिक अवस्थेतच ती सृष्टीत सापडतात. जसे हैड्रोजनसारखे वायु किंवा लोखंडासारखे घनपदार्थ. गणितातील मूळ अवयवांशी (Prime numbers) मूलतत्वांची कल्पना जुळणारी आहे. उदा. १, २, ३,५,७ हे मूळ









अनुक्रमणिका

अवयव इतर आंकड्यापासून बनवता येत नाहीत. मूलतत्वे म्हणजे स्वयंभू ज्योतिर्लिंगासारखी आहेत. ज्योतिर्लिंगे वारा आहेत तर मूलतत्त्वे ९२ किंवा ९८ आहेत. प्रथम बॉयलने सुवर्ण हे मूलतत्त्व आहे असे प्रतिपादिले. नंतर लाव्हासीये या फ्रेंच वैज्ञानिकाने २८ मूलतत्वांची यादी जगास सादर केली. या मूलतत्वांच्या संशोधनातूनच अणूंच्या अंतरंगाचा शोध घेण्याची स्फूर्ति मानवाला झाली.

## अणु-विघटनाची पूर्वतयारी

१९ व्या शतकातील डाल्टन या शास्त्रज्ञाला 'अणुपिता' अशी संज्ञा आहे. हायड्रोजन व ऑक्सीजन वायु अणुरुप आहेत, हे त्याने प्रयोगाने सिद्ध केले. त्यापूर्वी अणूंची कल्पना अस्तित्वात होतीच. पण अणूंचे अस्तित्व केवळ परिस्थितीजन्य पुराव्यावरच आधारले होते. डाल्टनने असे सिद्ध केले की एक औंस ऑक्सीजनमध्ये आठ औंस हायड्रोजन वायु मिसळल्यास नऊ औंस पाणी तयार होते. पाण्याचे $H_2O$ हे घटकसूत्र सर्वपरिचीत आहेच.

अणूंचा परमाणु होतो हे अव्हागाद्रो या विज्ञानपंडीताने दाखवून दिले. त्याला 'परमाणूंचा पिता' म्हणता येईल. ब्राऊन या शास्त्रज्ञाने पाण्याचे प्रयोग करून असे सिद्ध केले की पाण्याचे परमाणु सतत प्रवाही असतात. दिव्याच्या ज्योतीत हा परमाणु-प्रवाह स्पष्ट दिसतो. सूर्याच्या कवडशात आपल्याला असंख्य परमाणु हवेत तरळताना मजेदार दिसतातच की नाही!

आतापर्यंत आपण अणूंची ऐतिहासिक कल्पना व त्यांचे अस्तित्व पाहिले. डाल्टनने अणूंचे अस्तित्व प्रयोगशाळेत प्रस्थापित केले. अणूंच्या अंतरंगात शिरून त्यांची घटना, रचना पाहाण्याची जिज्ञासा शास्त्रज्ञांस होतीच. प्रयोगनलिकेतील विरल वायुतून विद्युत्‌किरण प्रवास करतात, तेव्हा होणाऱ्या प्रतिक्रियेद्वारे त्या वायूतील इलेक्ट्रॉनचा ( अणुतील ऋणकणांचा ) शोध लागला. म्हणजे इलेक्ट्रॉन ही "टेस्टट्युब-बेबी" म्हणता येईल.



तिला वाटते आपण कोंबडी आहोत....आता येथून तिला परत न्यायचे म्हणजे अंडी हवीत...

थॉमसन क्रुक्स वगैरे शास्त्रज्ञांनी हे प्रयोग केले. या प्रयोगाचे पोटीच १८९५ मध्ये रॉटजनने क्ष-किरणांचा शोध लावला. ते किरण इतके प्रभावी असतात की घनपदार्थांना त्यांचेमुळे पारदर्शकत्व येते. या किरणांच्या शोधाने मानवाने पदार्थांच्या नैसर्गिक गुणधर्मावरसुद्धा मात केली. वैद्यकीय शास्त्रात या क्ष-किरणांची किती उपयुक्तता आहे हे सांगण्याची जरुरी नाही.

## किरणोत्सर्गाचे पहिले प्रयोग

एकोणीसाव्या शतकाचे अखेरचे दशक अणुशास्त्राचे प्रगतीचे दृष्टीने फार महत्वाचे आहे. १८९६ मध्ये बाकारेलला असे सुचले की जर प्रयोगशाळेत किरणोत्सर्गी परिस्थिती निर्माण करता येते, तर सृष्टीतही किरणोत्सर्गी (Radio-active) स्वयंभूतत्वे असली पाहिजेत. म्हणून त्याने युरेनियमवर प्रयोग केले. ही कल्पना त्याला क्ष-किरणांचे शोधाने स्फुरली. १८९८ साली क्युरी दंपतीने रेडियमचा शोध लावला व विज्ञानातील एक महत्वाचा टप्पा गाठला. रेडियमचे आगमनापूर्वी अणूंच्या अंतरंगाचा ठाव घेणे शास्त्रज्ञास कठीण होते. पण एकाद्या घरभेद्याने किल्ल्यातून अनंत दोर सोडावे व त्यांचे साह्याने शत्रूसैन्याने किल्ल्यात सहज प्रवेश करावा तसे झाले. किरणोत्सर्गी तत्वातून अखंड किरणांचा उद्रेक होत असल्याने त्या किरणांचा मागोवा घेत अणूंच्या पोटात शिरून सृष्टपदार्थांचा रहस्यस्फोट करणे संशोधकास सुलभ झाले म्हणूनच रेडियमला आपण अणूविज्ञानाचा 'सूर्याजी पिसाळ' म्हणणे गैर होणार नाही. त्यापूर्वी १८९७ मध्ये जे. जे. थॉमसन यानी इलेक्ट्रॉन हा अणु-वस्तूमानापेक्षा (Atomic Mass) २००० पट हलका आहे, असे दाखवून दिले. रदरफोर्ड या वैज्ञानिकाने या बाबतीत खूप प्रयोग केले व १८९९ साली त्याला असे आढळून आले, की किरणोत्सर्गी पदार्थापासून तीन प्रकारचे किरण अखंड स्फुरत असतात :

१) अ-किरण (Alfa-Rays) हे अणूंतील घनकण होत. ते अणूतील ऋणकणापेक्षा सुमारे दोन हजारपट जड असतात. यानाच प्रोटोन म्हणतात.

२) ब-किरण (Beta Rays) किंवा इलेक्ट्रॉन. म्हणजे अणूतील ऋणकण. ते फारच हलके असतात. चुंबकीय क्षेत्रापासून ते तोंड फिरवतात.

३) ग-किरण (Gama Ray) हे क्ष-किरणापेक्षांहि अधिक प्रभावी आहेत. त्यामुळे पदार्थांचा भेद करण्याची त्यांची ताकद फारच तीव्र असते. विद्युत वा चुंबकीयक्षेत्रांचा या जातीचे किरणावर काहीही परिणाम होत नाही.

या त्रिविध किरणांचे शोधामुळे हे दिसून आले की पदार्थाचे पोटात केवढी शक्ति आहे. पदार्थ अचेतन तर शक्ति चेतन. अचेतनातून चेतनाचा उद्‌भव. दहाव्या शतकात श्रीशंकराचार्यांनी शांकरभाष्यात या सृष्टिसत्याचे उदाहरण म्हणून शेणापासून विंचवाचा जन्म होतो असा दाखला दिला आहे. शास्त्रज्ञांना या सृष्टीचमत्काराचे गूढ प्राचीन कालापासून





आहे. त्या रहस्याचा उलगडा १९०६ साली आईनूस्टाईन या विज्ञान-सम्राटाने केला. त्याने शोधलेले सूत्र असे: $E=MC^2$ E (Energy) म्हणजे शक्ति. M (Mass) म्हणजे पदार्थाचे वस्तुमान, व C म्हणजे प्रकाशाचा दर सेकंदास १८६००० मैल हा प्रचंड वेग. या समीकरणाने शक्ति व वस्तुमान ही परस्पर परिवर्तनीय आहेत हे सिद्ध झाले. किरणोत्सर्गी पदार्थातून बाहेर स्रवणाऱ्या किरणांपासून उष्णता निर्माण होते. हे किरण म्हणजेच पदार्थांच्या वस्तुमानाचे शक्तीत झालेले रुपांतर आणि या किरणांची शक्ति मोजण्याचे माप म्हणजेच वरील सूत्र होय. हे सूत्र आईनूस्टाईनने वयाचे २६ वे वर्षी जगाला बहाल केले.

## अणूची अंतर्गत रचना

ह्या समीकरणाने अणूंचे अंतरंगस्वरुप जाणून घेण्याचा प्रयत्न करणाऱ्या शास्त्रज्ञास मोठा तात्विक आधार वाटू लागला. या सूत्राचे बैठकीवर प्रयोग शाळेतील प्रयोग अधिक आत्मविश्वासाने होऊ लागले. रदरफोर्ड (न्युझिलंड) व नीलबोर (डॅनिश) या शास्त्रज्ञांनी अणूंचे अंतरंगावर निकराचा हल्ला केला. १९११ साली रदरफोर्डला अणुगाभ्याचा (Nucleus) शोध लागला. अणुगाभा हा अणोरणीयः त्यात घनकण (Protons) व न्युट्रोन म्हणजे तटस्थकण असतात. नीलबोरने १९१३ साली असा सिद्धांत मांडला की ऋणकण हे अत्यंत प्रचंड वेगाने (प्रकाश-वेगाचे $\frac{3}{4}$ वेगाने) अणुगाभ्याभोवती घिरट्या घालीत असतात त्यामुळे ते गाभ्यातील घनकणावर आदळत नाहीत. पृथ्वी प्रचंड वेगाने सूर्याभोवती फिरत आहे म्हणून बरे. उद्या जर तिची गति थांबली, तर ती सूर्याकडे जोरात आकर्षिली जाईल व मग तिचे काय होईल हे कल्पनेवरच सोपविलेले बरे. तसेच ऋणकणांचे आहे. या शोधामुळे अणु हा ऋण व घन मिश्रित असला तरी तो झटका (shock) का देत नाही या कोड्याचा उलगडा झाला. वरून थंड अचेतन दिसणाऱ्या अणुमध्ये केवढी गतिनिष्ठ उलाढाल चालू आहे हे सिद्ध झाले. प्रत्येक अणूत प्रचंड पोकळी आहे. व त्या पोकळीत हे ऋणकण प्रचंड वेगाने गाभ्याभोवती जेट विमानासारख्या अखंड फेऱ्या घालीत असतात. म्हणजेच अणु हा केवढा फसवा आहे पहा! बाह्यरूपापेक्षा साफ वेगळा. बाह्यतः अचेतन पण आतून सचेतन! बाहेरून थंड तर आत विद्युत्-शक्तीने पेटलेला!! वरकरणी घट्ट तर आतून पोकळ!!!

उपलब्ध माहितीचे आधारावर रदरफोर्ड व बोर यानी अणूचे एक मॉडेल तयार केले. प्रत्येक अणु ही एक छोटी सूर्यमालिकाच होय. अणूतील सूर्य म्हणजे अणुगाभा होय. अणुगाभा हा अणूतील सर्वात घट्ट व वजनदार भाग होय. त्यात कमीतकमी एक घनकण

असतो. व एक किंवा अधिक तटस्थकण. या गाभ्याभोवतीचे पोकळीत कमीत कमी एक ऋणकण प्रचंड वेगाने गाभ्याभोवती फिरत असतो. उदाहरणार्थ–हैड्रोजन या मूलतत्वात एक घन व एक ऋणकण असतो. हा घनकण ऋणकणापेक्षा सुमारे दोन हजार-पट जड असतो. जड घनकण स्थितीप्रिय आहे, तर हलकाफुलका ऋणकण गतिप्रिय. हायड्रोजन हे क्रमांक एकचे मूलतत्व गणले जाते. ऋणकणांची व घनकणांची संख्या प्रत्येक मूलतत्वात सारखी असते. त्यावर अणुक्रमात (Atomic Number) शास्त्रज्ञानी ठरवला आहे. सुवर्णामध्ये ७९ घन व तितकेच ऋणकण आहेत म्हणून सुवर्णतत्वाचा क्रमांक मूलतत्वाचे यादीत ७९ वा लावलेला आढळतो. सुवर्णाचा अणुक्रमांक किंवा अनुक्रमांक म्हणा ७९ आहे, तर त्याचा अणुवस्तुमान क्रमांक (Atomic Mass) १९७ आहे. अणुवस्तुमान क्रमांकातून अणुक्रमांक उणे केला की आपल्याला अणुगाभ्यातील तटस्थ-कणांची संख्या सापडते जसे (१९७ –७९=११८) म्हणजे सुवर्णामध्ये ११८ तटस्थ कण असतात.

जागतिक राजकारणात जसा तटस्थ राष्ट्रांना भाव आहे, तसाच भाव अणुविज्ञानात तटस्थकणांना आहे. १९११ मध्ये रदरफोर्डनी त्यांचे अस्तित्व सिद्ध केले. पण त्यानंतर २१ वर्षांनी सर जॉन चाडविक यांनी त्यांची तटस्थता सिद्ध केली. म्हणजे हे कण विद्युत् वा चुंबकीय क्षेत्रास मुळीच दाद देत नाहीत. घनकणांप्रमाणे ते विद्युत्शक्तीने भारावलेले (charged) नसतात किंवा ऋणकणाप्रमाणे ते ऋणविद्युत्किरणानीही भारावलेले नसतात. तटस्थता हाच त्यांचा स्थायीभाव. अणुगाभ्यात ते घनकणाशी निगडीत असतात. किंबहुना घन व तटस्थकणांचे संयोगानेच अणुगाभ्याला स्थैर्य येते. तटस्थकिरण हेच अणुगाभ्याचे सिमेंट होय. अणुगाभ्यात घन व तटस्थ कण जोडीजोडीने आढळतात.

## ‘युरेनियम-’ निसर्गसिद्ध तत्व

घन व ऋणकण गणित श्रेणीने एक ते नऊपर्यंत वाढत जातात. त्यांच्यात एक प्रकारची लय आहे म्हणूनच त्या कणांचे संख्येप्रमाणे ९८ मूलतत्वे मानली आहेत. त्यातील ९२ वे ‘युरेनियम’ हे अंतिम निसर्गसिद्ध तत्व होय. बाकीची सहा तत्वे प्रयोगशाळेत कृत्रिमपणे करता येतात. त्यांना Trans — Uranium म्हणतात. तटस्थकणांचे संख्येत मात्र ही लयबद्धता मूलतत्वांच्या चढत्या भाजणीचे अनुक्रमात दिसत नाही. एका मूलतत्वातही या तटस्थ किरणांची संख्या निरनिराळी असते, पण अनियमित मात्र नाही हं, कारण नियमबद्धता हे तर सृष्टिरचनेचे सूत्र आणि ती नियमनिष्ठता शोधून काढणे, हेच वैज्ञानिकाचे कार्य. तटस्थकणांचे बदलत्या संख्येने एकाच मूलतत्वाचे विविध नमुने आढळतात त्याना Isotopes म्हणतात. हा ग्रीक शब्द आहे. त्याचा अर्थ त्याच जागेत सनजा राणे नांवाचे कुटुंब आहे. त्यातील कुटुंबप्रमुख पिता व माता हे घन व ऋणकण तर त्यांची अपत्ये, ही तटस्थकण.

आता एका राणे कुटुंबास तीन मुले असली व दुसऱ्या राणे कुटुंबास चार असली तर ती कुटुंबे राणे या नांवानेच ओळखली जातात. तसेच आहे मूलतत्वांचे बाबतीत. उदाहरणार्थ, ‘टिन’ या ५० अनुक्रमांकाचे मूलतत्वाचे बाबतीत. तटस्थ किरणांचे बदलत्या संख्येमुळे दहा प्रकार ( Isotopes ) सापडले आहेत. पण ते तत्व ‘टिन’ या नांवानेच ओळखले जाते. कारण या टिनचे दशावतारात घनकणसंख्या पन्नास व ऋणकणांचीही संख्या पन्नासच असते. फरक मात्र तटस्थ किरणांचे संख्येत (६२ पासून ७४ पर्यंत) पडतो. अणुगाभ्याच्या जागा मर्यादित. त्यांतच ही तटस्थकण संख्या दाटीवाटीने सामावते. पण अणुक्रमात जसजसे पुढे जावे तसतसे अणूचे मर्यादित विश्व अपुरे पडू लागते व त्यामुळे अणूतील कण किरणरुपाने बाहेर फेकले जातात. गाडीचे डब्यात गर्दी खूप वाढली की काही उतारूंना फूटबोर्डवर किंवा टपावर प्रवास करण्याचा प्रसंग येतोच. अशा रीतीने जडकणांचे चैतन्ययुक्त किरण बनतात व पदार्थ आणि शक्ति हे परस्पर परिवर्तनीय आहेत हे सिद्ध होते.

## अणूचा विस्फोट व आण्विक अस्त्र

आतापर्यंत आपण अणूंचा इतिहास व रचना पहिली. आता अणुभंगाचा विचार करू या. हनुमानाला रत्नांची माळ बक्षीस मिळाली. त्यातील प्रत्येक रत्न त्याने दातांनी फोडले व त्यात राम आहे काय, हे पाहिले. शास्त्रज्ञ सुद्धा हनुमानासारखाच आपल्या शास्त्रावर भक्ति करतो. "मी अभेद्य आहे," ही अणूंची बढाई मानवाच्या बुद्धीला सतत आव्हान करीत होती; तेव्हा वैज्ञानिकानीं अणुभंग करण्याचे प्रयोग सुरू केले, यात नवल ते काय? फर्मी या इटालियन वैज्ञानिकाने अनुभंग करण्याचे प्रयत्न सुरू ठेवले. त्याने तटस्थ-कणांचा मारा अणूवर जोरात केला. अखेर अणूचा प्रतिकार संपला व डिसेंबर १९३८ मध्ये हॅन व स्ट्रॉसमान या जर्मन शास्त्रज्ञांनी युरेनियमचा अणु त्याच्यावर तटस्थकणांचा मारा करून फोडला (दुभंग केला) भगवान् विष्णूनी नारसिंह अवतारी हिरण्यकश्यपूचे पोट फाडून जगाचे कल्याण केले. पण या दोन नृसिहानी अणूचे पोट फाडून आज जगाला विनाशाचे टकमकीवर उभे केले आहे. या अणुभंगाचे कार्य किती दुष्कर असेल! हायड्रोजनचे वीस कोटी अणु एका इंचात दाटीवाटीने बसू शकतात. एका शास्त्रज्ञाने असे म्हटले आहे की मानव हा अणूपेक्षा जितकेपट मोठा आहे तितकेपट विश्व मानवापेक्षा मोठे आहे. या अणूचा भंग करण्यासाठी शास्त्रज्ञांनी कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ या न्यायाने अणूवर तटस्थकणांचा सतत तीव्र मारा (bombarding) केला. आहे की नाही तटस्थकणांचे असाधारण महत्व!

अरेबियन-नाईटस्मधील छोट्या दिव्यातून प्रचंड राक्षस निर्माण झाला, तसेच या अणूभंगातून अणूबाँबचा जन्म १९४५ साली झाला. त्याचा पिता म्हणजे सुरुवातीस उल्लेख केलेले जर्मन संस्कृतज्ञ शास्त्रज्ञ ओपेनहेमरसाहेब. अणूबाँबचे निर्मितीसाठी युरेनियमचे महत्व फार आहे. निसर्गावस्थेत सापडणाऱ्या युरेनियमचे अणूवजन २३८ असते त्यास U — 238 म्हणतात. पण बाँबचे सिद्धिसाठी त्याचा U–२३५ हा प्रकार लागतो. U–२३८ मध्ये ९२ घन कण असतात व १४६ तटस्थकण. त्यातील तीन तटस्थकण दूर काढून U–२३५ हा युरेनियमचा प्रकार प्रयोगशाळेत किंवा अणुभट्टीत संपादन करून मग तो युरेनियमविशेष अणुबाँबसाठी वापरतात. ६–८–४६ रोजी हिरोशीमा शहरावर तसल्या पहिल्या अण्वस्त्राचा प्रयोग झाला व ८ तारखेस नागासाकीवर झाले. सहस्रसूर्यांची झळाली झळकली व दुसरे महायुद्ध अचानक आटोपले.

आज अणुशास्त्रात मानव प्रगति करीत आहे पण त्यात जगाचा विनाश आहे की विकास? भारतात पंडीत नेहरूंचे मार्गप्रेरणेने अणुभट्टी सुरु झाली आहे. आणि त्या संशोधनाचा उपयोग शांततेचे व समृद्धीचे मार्गाने केला जाणार आहे हे भारतास अभिमानास्पद आहे. सहस्रसूर्यांच्या झळाळीची कल्पना भारतीय भगवंतास स्फुरली. तोच भारत जगास मार्गदर्शक होवो.

●●●

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



एक कलावंत आत्मा

# सलील चौधरी



**सलील** चौधरी हे नांव उच्चारलं की आठवण होते ती बिमल रॉयच्या 'परख' मधील त्या नितांत सुंदर 'ओ सजना बरखा बहार आयी' या गाण्याची. या गाण्याबद्दल लिहिताना मराठीतल्या एका ज्येष्ठ रसिक साहित्यिकाने "हे गाणे जो जो ऐकावे तो तो एक एक नवा पदर उलगडल्याचा भास होतो" असे लिहिले होते. सिनेमा संगीत म्हटले की एकजात नाके मुरडणाऱ्या महाभागांनी हे गाणं लक्षपूर्वक ऐकावं आणि संगीत म्हटल्यानंतर ते कोणत्याहि आकार (Form) किंवा परिमाण (dimension) यात येवो, पण मेलडीच्या अंगभूत सौंदर्याचे त्याला लेणे लाभले, म्हणजे सारे रूढ संकेत लोपवून ते मनाला धुंद कसं करून टाकू शकतं ह्याचा अनुभव घ्यावा. खांसाहेब अल्लाउद्दीनखानसारख्या महर्षींनी या गाण्याचा, बिमल रॉय त्याना भेटले असता, आवर्जून उल्लेख केला, यावरून त्या गाण्यात असलेल्या सांगीतिक सामर्थ्याचे अनुमान बांधले जावे. असे हे संगीत बांधणारे सलील चौधरी सुरांचे सौंदर्य पकडणारे आणि त्याना ऑर्केस्ट्र्याच्या गुंफणीत बेमालूम मिसळून देऊन त्यातून त्यांची सतत भासमान होणारी दीप्ति निर्माण करणारे.

**भास्कर उत्तरवार**

सलीलदांबद्दल बोलताना He is a great composer असे शब्द नेहमीच वापरले जातात पण त्यांची compositions कां मोठी हे मात्र फार थोड्याना माहित असते. केवळ लोकप्रियता हेच ह्या थोरपणाचं गमक नव्हे. त्यापेक्षा फार मोठं गमक म्हणजे composition मध्ये असलेले मेलडींचे वैचित्र्य आणि गुंफण. पुष्कळाना सिनेसंगीताच्या ह्या अंगाची ओळखच झाली नसते. वाद्यांचा कर्कश मेळ आणि त्यात मधून मधून पेरलेले उंच पट्टीतील गाण्याच्या स्वरांचे तुकडे म्हणजे सिनेसंगीत अशीच अजून कित्येकांची–विशेषतः मराठी श्रोत्यांची–कल्पना झालेली असते. याला कारण भारतीय शास्त्रीय संगीताच्या घाटणीतूनच ते सिनेसंगीताकडे बघतात आणि मूलतः वेगळ्या असलेल्या या प्रकाराबद्दल ते गैरसमज करून घेतात. एखाद्या रागदारीवर आधारलेल्या गाण्याची ते प्रशंसा करतील पण त्यापेक्षा अधिक कौशल्यानं रचलेल्या पण रागदारीवर आधारित नसलेल्या गाण्याला ते नाके मुरडतील. हे असे घडण्याचे कारण त्याना सिनेगीताची मूळ बैठकच समजलेली नसते








शास्त्रीय पद्धतीच्या गायकाला एकच परिमाण असते. ठरलेल्या सूरमालिकेतून गायक किंवा वादक आपापल्या मगदूराप्रमाणे स्वरांचं विश्व उभारतो. ते व्यक्तिसापेक्ष असल्यामुळे एकांगी असतं. सिनेगाण्यात एकापेक्षा अधिक व्यक्ति निगडीत असतात. वाद्ये आणि मौखिक गायन यांचा त्यात मेळ असतो. तो एकमेकाला पोषक आणि पूरक असतो. त्यामुळेच त्याला एकापेक्षा अधिक परिमाणे निर्माण झालेली असतात. ते एक गाणे असते, गायन नव्हे. त्या गाण्याची प्रतिमा निर्माण होते, ती संगीतकाराच्या प्रतिभेत आणि ते उतरते ते गायकाच्या गळयातून आणि वाद्यवृंदाच्या वाद्यातून. त्यातील प्रत्येक जागेची अगोदरच बांधणी झालेली असते. आणि म्हणूनच ती खऱ्या अर्थाने संगीतकाराची निर्मिती असते. संगीतकाराची प्रतिभा जेवढी श्रेष्ठ तेवढीच ही निर्मितीहि श्रेष्ठ ठरते.

सलीलदांचा आवर्जून उल्लेख केला जातो, तो ह्या त्यांच्या निर्मितीच्या श्रेष्ठत्वासाठी. तिच्या वेगळेपणासाठी. नेहमीच्या ठरीव ठश्याच्या सांकेतिक रचनेतून त्यांचे गाणे साकार होत नाही. सर्वसाधारणतः आढळणाऱ्या पद्धतीने— प्रथम प्रास्ताविक वाद्यांचा तुकडा मग ध्रुपद, पुन्हा एकदा जोडणारा वाद्यांचा तुकडा मग अंतरा; याच प्रकारे उरलेले अंतरे यात त्यांची गाणी बांधलेली नसतात. रचना करताना सर्व गाण्यांची सुरावली ते खुली ठेवतात. त्या सुरावलीत सुरांचे निरनिराळे वैचित्र्यपूर्ण melodious patterns गुंफतात. त्यातील प्रत्येक मेलोडीला उठाव आणण्याला जोड म्हणून नेमके वाद्य वापरतात आणि हे सर्व करीत असतानाच त्या संपूर्ण गीताची बंदिश एका सरळ सूत्रात ओवीत नेतात. ह्या दृष्टीतून त्यांच्या रचनांकडे बघितलं म्हणजे, ते वेगळे कां ह्याचा उलगडा होतो. ते नुसत्या स्थायी आणि अंतरा यावरच रेंगाळत नाहीत, तर बंगाली संगीतात आढळणारी आणि रविंद्र संगीतात मुक्तपणे वापरलेल्या

**पारंतत्र्याच्या काळात आग ओकणारी सलीलदांची प्रतिभा आज सौंदर्य प्रसवते आहे. संपन्न रचना करीत आहे. पण ती नाविन्याचा हव्यास टिकवून आहे. प्रतिदिनी प्रयोग करीत आहे. करीत राहील व रसिकाला सदैव एका अत्युच्च आणि भारावलेल्या वायुमंडलात नेऊन ठेवतच राहील.**

संचारीचाहि ते नेहमी उपयोग करतात. 'ओ सजना' मध्ये वर लिहिलेले सर्व प्रकार त्यानी केले आहेत म्हणूनच ते गाणं एकदम वेगळं वाटतं, आणि या वेगळेपणानंच कायम लक्षात राहतं.

सलीलदांची ही प्रतिभा बिमल रॉयनी अचूक हेरली. सत्येन बोस याच्या 'परिवर्तन' या बंगाली चित्रपटाची कथा आणि संगीत सलील चौधरींचे. (यावरूनच पुढे गाजलेला 'जागृति' हा चित्रपट तयार करण्यात आला.) एक दिवस कलकत्त्याला त्यांनी सलीलदांनी लिहिलेली त्याची कथा 'रिक्षावाला' ही बिमलदांना ऐकवली. आणि त्यावर काही एक भाष्य न करता बिमल रॉयनी मुंबईला आल्यावर सलीलदांना मुंबईला निघून यायला तार ठोकली. ह्या 'रिक्षावाला' कथेवरच बिमल रॉयनी त्यांचा अतिशय गाजलेला 'दो बिघा जमीन' हा चित्रपट निर्माण केला. या पहिल्या चित्रपटानेच सलीलदांना एक कथालेखक आणि संगीत दिग्दर्शक म्हणून फार उंचीवर नेऊन बसवलं.

बिमल रॉय यांच्या ज्या ज्या चित्रपटांना सलीलदांनी संगीत दिले, त्या त्या मध्ये त्यानी संगीताचे अनेक प्रयोग केले आहेत. बंगाल आणि आसाममध्ये भारतीय जननाटय संघाचे कार्य करीत असताना गोळा केलेल्या बंगाली आणि आसामी लोकगीतांच्या सुरावटींचा मुक्तहस्ताने त्यानी वापर केला. सलीलदांचा मूळ आत्मा प्रागतिक विचारसरणीचा. त्याच पायी त्यानी रशियन, युक्रेनियन, उझबेक, हंगेरी येथील लोकगीतात आढळणाऱ्या स्वररचनांचा अभ्यास केलेला होता. तो करताना ह्या सर्व संगीतातील आत्मा भारतीय संगीताच्या आत्म्याला फार जवळ आहे ह्याची जाणीव त्यांना झालेली होती. हा सर्व अनुभव त्यानी जाणिवपूर्वक 'दो बिघा जमीन'मध्ये वापरला. त्यातील प्रसिद्ध "धरती कहे पुकारके" या गाण्याचे मूळ स्वर रशियन. ते स्वर सलीलदांनी प्रथम ऐकले तेव्हा त्या स्वराना असलेली आपल्या भैरवीची झालर मोठी आश्चर्यकारक वाटली होती. तीच त्यानी ह्या गीतात वापरली. मधुमतीतील 'कोई उतारो बिछुवा'च्या स्वरांचा जोष आसामी लोकगीतांचा, तर 'दिल तडप तडप के कह रहा'ची धुंदी हंगेरीयन लोकगीतातली.

पण सलीलदा केवळ लोकगीतांना सिनेसंगीतात आणून थांबले नाहीत. सिनेगीताच्या चालीना आणि ऑर्केस्ट्रा याला त्यांनी बांधीव चाकोरीतून बाहेर काढून मोकळे केले. गाण्यांना स्वच्छंद अश्या मुक्त चाली दिल्या आणि त्यात निर्झराच्या बेधुंद खळाळण्याचा जोष आणला. 'उसने कहा था'मधील 'रिमझिमके ये प्यारे प्यारे गीत लिये' ह्या गाण्यात असाच खळाळता जोष आहे. हे गाणे मुखडयाने सुरवात होऊन अनेक नागमोडी वळणे घेत घेत परत मुखड्यालाच येऊन मिळते. ह्या गाण्याचं ऑर्केस्ट्रेशनहि तसंच नागमोडी आहे. किंबहुना ही नागमोडी वळणे हे सलीलदांच्या ऑर्केस्ट्र्याचे वैशिष्ट्य. त्यामुळेच जाणत्यात म्हटलं जात की असले आर्केस्ट्रेशन सलीलदाच करू जाणे !

सलीलदा संगीताच्या एकाच एक ढंगात गुंतून राहिले नाहीत. देशोदेशीच्या लोकगीतांचा त्यांना जेवढा हव्यास, तेवढाच पाश्चात्यांच्या ऑर्केस्ट्राचा आणि भारतीय रागदारीचा. त्यांचे 'परिवार'मधील 'जा मैं तोसे नाही बोलूं' हे







कर्नाटकातल्या हंसध्वनी रागावर आधारलेले गीत त्याची साक्ष देते. त्याना पाश्चात्यांच्या संगीतातील "हार्मनी" आणि "कॉर्ड सिस्टीम"च्या प्रगल्भतेची आणि अंगभूत सामर्थ्याची जाणीव आहे. निरनिराळ्या बेसमध्ये निरनिराळ्या वाद्यांचे सूर बांधून ते एकमेकांना छेदीत नेऊन पुन्हा त्यांचा एकसूत्री–एकसंध गोफ तयार करण्याने निर्माण होणारी सुरावली ही एकांगी सुरावलीपेक्षा अतिशय प्रभावी ठरते. आणि तिचा योग्य उपयोग करायला, त्यात निरनिराळे प्रयोग करायला सिनेमासारखे प्रभावी माध्यम मिळाले, म्हणजे तिच्यातून प्रतिभाशाली संगीत निर्माण करता येते, हे सलीलदा जाणून आहेत. याच दृष्टीने त्यांचे सतत प्रयोग सुरू असतात. Cord Progression च्या पद्धतीनं संगीताची बांधणी करणं हे फार किचकट आणि आव्हान देणारं काम आहे. दोन किंवा तीन सुरांच्या एका मालिकेला वाह्यतः अगदी विसंवादी वाटणाऱ्या दुसऱ्या तितक्याच सुरांच्या किंवा एखाद दुकट्या सुराच्या मालिकेने छेद देत देत प्रतिसंगीत (counter-music) निर्माण करणे आणि तरीहि त्या संपूर्ण तुकड्याला हार्मनीचा परिणाम आणणे यासाठी कसलेली प्रतिभा पाहिजे. प्रत्येक वाद्याच्या स्वरसामर्थ्याच्या अंगभूत परिणामकारकतेची जाणीव पाहिजे, तरच हे शक्य होतं. आपल्या ऑर्केस्ट्रात तीस चाळीस व्हायोलीन्स एका वेळी वाजत असताना त्या गदारोळात सुद्धा आपल्या सहाय्यकाला 'कानूदा, दॅट फोर्थ व्हायोलीन इन द थर्ड रो इज आऊट ऑफ टचून !' असे म्हणताना ते आढळतात तेव्हा त्यांच्या तयार कानाचं कौतुक वाटायला लागतं ! त्यांच्या नुकत्याच पूर्ण झालेल्या 'पिंजरेके पंछी' मध्ये त्यानी ह्या पद्धतीनं फार प्रभावी ऑर्केस्ट्रेशन केलं आहे. जाणकारांनी ते लक्षपूर्वक जरूर ऐकावं.

ऑर्केस्ट्र्याच्या आणि वाद्यांच्या ह्या अंगभूत सामर्थ्याच्या ज्ञानामुळेच त्यांनी आपल्या संगीतातून दृश्य परिणाम (visual effects) फार सुंदर साधले आहेत. मधुमती ह्या चित्रपटाची संपूर्ण कथाच हिमालयाच्या कुशीत घडते. त्यामुळे सारं चित्रण होतं ते निसर्गाच्या सान्निध्यात. त्यात असल्या दृश्य परिणामाला फार मोठा वाव होता आणि सलीलदांनी त्या संधीचा पुरेपूर उपयोग करून घेतला.

दृश्य संगीत (visual music) हा पार्श्वसंगीताचा एक भाग. सिनेमात पदोपदी वापरला जाणारा. आपण बडे गुलाम अलीखाँच्या आठवणी वाचताना एखाद्या तरुणीची डौलदार चाल किंवा आकाशात उडणाऱ्या पक्षाची स्वच्छंद भरारी ते आपल्या स्वरात पकडतात असं वाचतो. ती भरारी प्रत्यक्ष डोळ्याने पाहण्यापेक्षा गाण्याच्या माध्यमातून कानाने जाणली तर ते एक दृश्य न ठरता, एक अनुभव ठरतो. पण जेव्हा एकीकडे ती भरारी पडद्यावर दिसते आणि दुसरीकडे तीच भरारी व्यक्त करणारे गाण्याचे किंवा वाद्यांचे सूर कानी पडतात तेव्हा त्या दोघांना मिळून होणारा परिणाम अतिशय प्रभावी ठरतो. हा परिणाम केवढा प्रभावी असतो, हे बघायचे झाल्यास ह्या दृष्टीतून मधुमती चित्रपट पुन्हा बघावा. त्यातील दृश्यांचेच नव्हे तर गाण्यांचे चित्रिकरण आणि पार्श्वसंगीतहि बघावे. 'सुहाना सफर' ह्या सुंदर गाण्याच्या वेळी 'हमे डर है हम खो न जाएं कहीं' अशी भीति डोंगरमाथ्यावर उंच उभी राहून खालच्या खोल दऱ्यांकडे पाहत व्यक्त करणारा नायक, तो किती उंचावर एकटाच उभा आहे हे दाखवायला लाँगशॉटमधून टिपलेल्या त्या पहाडी बायकांची पाण्याकडे चाललेली रांग, लांबवरून येत असणारे त्यांच्या पायातील पैंजणांचे सीत्कार आणि एकूण सर्व वातावरणाला भरून टाकणारा मंद प्रतिध्वनी. आणि या सगळ्यांच्या एकत्रीकरणामधून साधलेला दृश्य परिणाम. ह्या परिणामासाठी सलीलदांनी मॅरॅक्स, ओबो इत्यादि वाद्ये साथीला घेतली होती. ह्या आणि बाकीच्या सर्व गाण्याचं चित्रण कसं करावं, कॅमेरा कुठे ठेवावा, पात्रांच्या हालचाली कशा कराव्या याचा सर्व आराखडा विमल रॉय यानी सलीलदांच्या सहकार्याने मुंबईहून करूनच नैनितालला नेला होता. त्या साऱ्या चित्रणाची रूपरेषा त्यानी स्टुडिओत बसून आखली होती, हे आठवले म्हणजे सर्जनशील मन केवढी प्रभावी निर्मिती करू शकते ह्याची कल्पना येईल.

सलीलदांनी विमल रॉय यांचे व्यतिरिक्त इतर दिग्दर्शकांकडेहि काम केले. मागच्या वर्षाचे राष्ट्रपति पदक मिळालेल्या 'चेम्मीन' ह्या मल्याळी चित्रपटाचे संगीत दिग्दर्शकहि तेच होते. पण त्यांच्या कलावंत आत्म्याचे विमल रॉय यांचेशी जसे coordination झाले तसे इतरांशी झाले नाही. असले घडायला अंतःकरणातल्या निर्मितीक्षम शक्तीचे सूत्र जुळायला हवे असते. ते जुळले होते बिमलदांशी. विमलदांच्या कल्पना सलीलदांनी उचलायच्या आणि सलीलदांच्या बिमलदांनी. याचमुळे 'दो बिघा जमीन' 'मधुमती' 'परख' ह्या चित्रपटांचे संगीत अमर ठरले.

असा हा सलीलदांचा आत्मा साहित्यातहि तेवढाच रमतो. ते जेवढे संगीतकार तेवढेच साहित्यिकहि आहेत. आपल्या एम्. ए. साठी त्यानी बंगाली साहित्य घेतले होते, आणि बी. ए. ला इंग्लिश वाङ्मयातील ऑनर्स. इंग्लिश नाटकांचं त्यांचं वाचन सतत चालू असतं. इंग्रजी आणि बंगाली पुस्तकांची त्यांच्याकडे कपाटे भरली आहेत. जिथं जिथं प्रागतिक विचार आढळतात, तिथं तिथं त्यांचा कलावंत आत्मा झेप घेतो. ते समजून घेतो. त्यात आपल्याला शोधू लागतो.










सलीलदांचा सुरवातीचा काळ असाच रोमांचक अनुभवांनी भरलेला आहे. बंगाल हा फार हळव्या मनाचा आणि सहनशील. पण अन्याय सहन व्हायच्या पलीकडे गेला की, असा उद्रेक होईल की ज्वालामुखीहि कमी पडावा. बंगालची सारी तरुण पिढी या क्रांतिकारक विचारांनी नेहमीच भारलेली असते. इंग्रजांच्या कारकिर्दीत होणारे अन्याय बंगालला कधीच पचले नाहीत. क्षणोक्षणी ठिणग्या उसळत होत्या. जमीनदारीच्या चरकात सामान्य शेतकरी आणि कारखानदारांच्या चक्रात सामान्य कामगार भरडून निघत होता. त्यातून निघणाऱ्या अश्याच एका ठिणगीने सलीलदांच्या कलावंत आत्म्याला हांक दिली. तो आत्मा पेटून उठला. त्या पेटत्या कलावंताला कलेचं आंगडं टोपडं घातलेलं गोंडस गोजिरवाणं स्वरुप आवडणं शक्य नव्हतं. त्याला हवी होती गोफणीतून सण आवाज करीत सुटणाऱ्या धोंड्यासारखी कला, काळजाला हात घालून गांजलेल्या जीवांची पुकार दिगंतात घुमविणारी. गांजलेल्या शोषित वर्गाचे घुसमटलेल्या आवाजाचे कढ उकळणारी. यातूनच त्यांच्या जनतेसाठी आणि जनतेची कला मांडणाऱ्या, भारतीय जननाट्य संघाचा अवतार झाला आणि त्याच्या व्यासपीठावरून सलीलदांनी रचलेली आणि त्यांनीच स्वरबद्ध केलेली गाणी साऱ्या बंगालमध्ये चैतन्य निर्माण करीत राहिली.

आज आपण स्वतंत्र आहोत. अन्यायाला ठणकावून जाब विचारताच तुरुंगात कोंबण्याची भाषा आज दिसत नाही पण त्या काळात आझाद हिंद फौजेच्या जवानांवर ब्रिटिश सरकारने खटला भरला तेव्हा सलीलदांनी सरकारला

**बिचार पोशी तोमार बिचार कोरबे जरा**
**आज जगे छे शेई जनता**

असा ठणकावून शाहिरी सवाल केला, तेव्हा साऱ्या बंगालचे बाहू काय फुरफुरून आले असतील ह्याची कल्पना त्या काळात वावरलेल्यांना चांगलीच येईल.

सुरवातीपासून सलीलदांचा पिंड प्रागतिक विचारांनी पोसला आहे. जनतेच्या दुःखाचे कढ त्यानी स्वतः शेतकऱ्यात आणि कामकऱ्यांत मिसळून अनुभवले आहेत. त्यांची दुःखे वेशीवर मांडण्यासाठीच त्यानी आपली कला राबवली.

आज त्यांच्या क्षेत्रात बदल झाला आहे. आज आपले म्हणवले गेलेले सरकार राज्यावर आहे. पारतंत्र्याची जाणीव संपली आहे आणि सलीलदांच्या कलेने त्याबरोबरच वळणहि घेतले आहे. लोकसंगीताच्या धुंदीत न्हालेली जी प्रतिभा पूर्वी आग ओकत होती तीच आज सौंदर्य प्रसवते आहे. संपन्न रचना करते आहे. पण ती आपल्या नाविन्याच्या, निर्मितीचा हव्यास टिकवून आहे. प्रतिदिनी प्रयोग करते आहे आणि करीत राहणार आहे.

सलीलदांचं व्यक्तिमत्व मी जवळून निरखलं आहे. अजूनहि वाटतं, हा थोर कलावंत कशाच्या तरी शोधात आहे. तो कशाचा हे मला कळतं, पण तरीहि एक छंद म्हणून मी नेहमी त्याचा मागोवा घेण्याचा प्रयत्न करीत असतो.

गेल्या पूजा उत्सवाच्या निमित्तानं त्यानी संगीत दिलेले आणि सविता चौधरीनी (पूर्वाश्रमीच्या सविता बॅनर्जी–आता सलीलदांच्या पत्नी) गायलेले H. M. V.-साठी) बंगाली गीत 'घुम घुम घुम घुम घुमंत' मला मोठे प्रतीकात्मक वाटते. त्यांच्याकडे गेलो म्हणजे, त्यांना ते गाणं मी लाव यला लावतो आणि त्या गीताच्या अर्थामध्ये..... खूप फीर फीर फिरून इथे उंचावर मी एकटा आलो आहे, कां आलो हे कुणालाच कळलं नाही–मलाहि कळत नाही...मी सलीलदांचा शोध घेत बसतो.

●●●



*तिनं ओठ जुळवून
गालातल्या गालातच मधुर हास्य
करून त्याच्याकडे पाहिलं व
लाजऱ्या मुलायम
भावांना डोळ्यांच्या अर्ध्या
पापणीत लपविलं ....*




—लुई फर्नांडिस

**पाळण्यात** स्वस्थ झोपलेल्या बाळजीवाकडे पाहता पाहता ती एकदम चपापली नि नंतर दचकली. तिच्या गौर भाळी धर्मबिंदू तरारून गोळा झाले. तिला त्याचं नवल वाटलं. तितकंच भयहि वाटलं. नवल वाटलं ते इतके दिवस आपण आपल्या बाळाकडे अगदीच निरखून कसं पाहीलं नाही याचं नि भय वाटलं ते बाळाचं रूप-स्वरुप आपल्या नवऱ्याच्या लक्षात तर आलं नाही ना... या शंकेनं.

तिचं समोर चित्त वेधलं. ती एक फोटो फ्रेम होती. जिझस आपल्या खांद्यावरून एक सूळ वाहवून नेत होता. त्याच सूळावर त्याला खिळवून मारलं जाणार होतं. लोकमतापुढं त्याला ते सगळं सगळं सोसलं, भोगलं पाहिजे...मरण पत्करलं पाहिजे. अन् आपल्याला—

तिचं पाळण्याकडे लक्ष गेलं. तिच्या कपाळावरून घामाच्या धारा ओघळत राहिल्या. दीर्घ श्वास मंदमंद होत गेला. जीवनाच्या विशाल सागराचा सुकला आटला किनारा तिला स्पष्ट दिसला. त्या किनाऱ्यावर विखुरलेल्या स्मृती क्षणाच्या शंख-शिंपल्या उचलण्याचा मोह तिला आवरता आला नाही.

★★

दारावरली कॉल-बेल वाजली. लॉरी इतक्या लौकर कसा आला? आश्चर्याच्या आकारात वेढून मार्था चट्कन् दाराजवळ गेली. दार उघडून तिनं पाहिलं. पाहातच ती राहिली. दाराजवळ उभी असलेली व्यक्तीहि तिच्याकडे पाहत होती. आश्चर्याचे, अनोळखी भाव चार नेत्रांत लपंडाव खेळत राहिले.

'माफ करा हं ! मी लॉरीला भेटायला आलो होतो...'

'लॉरी ऑफिसमध्ये आहे. या—आत या-' असं म्हणताना तिनं आपली चर्या हंसरी केली होती व त्याला निरखून बघावं तसं पाहिलं होतं.






ही व्यक्ति अगदीच सामान्य नाही नि त्याची देहाची ढवहि सामान्य नाही, हे तिनं ओळखलं.

आपण त्याच्याकडे फार बारकाईनंच निरखून पाहिलं असं तिच्या मनात आलं. त्याच्याहि ते लक्षात आलं असावंसं तिला वाटलं. त्यावर त्यानं अधिक विचार करू नये म्हणून तिनं झट्कन् आपल्या हातातल्या घड्याळाकडे नजर टाकली. हास्य करून म्हटलं,

'यायची वेळ झालीच आहे त्याची. बसा थोडा वेळ. जायची घाई नाही नं?'

त्यानं नकारार्थी मान हालवीत 'च्ऽऽ' असा उद्गार काढला व तिच्या पाठोपाठ तो आत गेला. तिनं दर्शविलेल्या खुर्चीवर तो बसला.

मार्थानं रिंग करून फोन कानाला लावला.

'हॅलो ऽऽ' मंद हास्य करून ती उद्गारली, 'कोण वोलतंय् ? लॉरीच का ? काम आटोपलं का तुझं ?.... मग वेळ न लावता बंगल्यावर ये बघू....! –अं–हं !... काम ना ? तसंच आहे... वाटल्यास मग जा तू... च्.ऽऽ अस्सं कायरे ? खटचाळपणा नको...! वाट बघतोय हं मी तुझी आच्छा ऽऽ !'

फोन खाली ठेवून ती जवळच्या खुर्चीवर येऊन वसताच त्यानं तिच्याकडे दृष्टिक्षेप टाकला.

'आपण लॉरीच्या... '

तिनं ओठ जुळवून गालातल्या गालातच मधुर हास्य करून त्याच्याकडे पाहिलं व लाजऱ्या मुलायम भावना डोळ्याच्या अर्ध्या पापण्यात लपवलं.

'फार आनंद झाला... प्रथम आपलीच भेट झाली. लॉरीचं लग्न झालं त्यावेळी मी फार फार दूर होतो. . . '

'दूर—?' असा प्रश्न करताना तिच्या भुवया वक्र झाल्या होत्या.

'आफ्रिकेला. . . '

'आपण. . . ' काहीतरी ओळखीचा धागा हाती यावा अशा चर्चेनं त्याच्याकडे प्रश्नार्थक नजरेनं पाहत ती उद्गारली नि तिला किंचित् मोकळं मोकळं वाटून हसूहि आलं.

'अरे, हो... मी माझं नांव सांगायलाच विसरलो की.' असं म्हणून तो खळाळून हसला.

त्या हास्यानं तिच्या गालावरल्या खळ्या रुंदावल्या.

'माझं नांव सायमन लोबो.'

'नांव एकलंय् मी... दिवसातून तीन चार वेळातरी हे नांव उच्चारलं जातं नि गतकालाच्या आठवणी पकडून लॉरी माझ्या-समोर ठेवतो.'

'फार फार मैत्री आमची...'

'लॉरीच्या शब्दा शब्दातून ती दिसून आलीय् मला.'

'लग्नाच्या वेळी मला प्रत्यक्ष हजर राहता आलं नाही. फार फार वाईट वाटलं बघा मला. मनाला वेग होता... तसा... मी विमानानं प्रवास करूनहि तुमच्या लग्नाला वेळी हजर राहू शकलो नसतो.'

तिनं नुसतंच त्याच्याकडे पाहिलं. त्याची नजर तिच्याच मुखावर खिळली होती. ती तिनं टाळली.

'तुमच्या लग्नाच्या दिवशी दुपारला तुमचं वेडिंग कार्ड हाती आलं माझ्या. आता तुम्हीच सांगा... मी कसा काय इथं पोचलो असतो ?'

'तुमची तरी यात काय चूक ? लग्न ठरलं ते आकस्मिक. त्यात लॉरीचीच अधिक धांदल नि जगावेगळी गडबड.'

त्याला हसू आलं... तिच्या शब्दाचं नव्हे आविर्भावाचं.

'प्रेमविवाह नाही का हा तुमचा ?' असा प्रश्न करताना त्याची नजर चौकसपणे आजुबाजूला फिरली होती. आतल्या भागाकडे वळली होती. त्याच्या चर्येवर उजळलेली कसली तरी कल्पना क्षणात मावळली होती.

त्याची ती हालचाल नि नजर तिला विलक्षण वाटली. तिनं प्रश्न केला,

'काय बघता ?'

'काहीच गडबड ऐकू येत नाही...'

'गडबड–?' तिच्या उद्गारात आश्चर्य ओसंडलं होतं.

'हो....'

'कुणाची ?'

'बाबा लोकाची !' गालभर हास्य खेळवीतच तो म्हणाला.

तिचा मुखचंद्रमा कृष्ण मेघानी वेढला.

'सात वर्षं झाली नाही का लग्नाला ?'

'हो...येत्या मेला पूर्ण होणार ती !'

'अजून–'

'दैव !'

त्यानं निःश्वास टाकला.

'पण असं...' किंचित् कचरतच नि एकेक शब्द तोडीत जोडीत तो उद्गारला, 'नियोजन आदि काही ?'

'नाही नं. कां करावं ?'

'अलिकडे फॅशन ठरत आलीय् ती...'

'आम्हाला तीव्र इच्छा... आमच्या प्रीतीची पुष्पं रूपाकारानं बंगल्यात बागडावीत, दर्वळावीत....'










'हं...!'

'दैवानं सगळं दिलंय्. दिलं नाही फक्त एकच... मूल !'

'होईल हो ! त्यात खंत करण्यासारखं आहे काय ? वय काय फार झालंय् का तुमचं ? कित्येकांना उशीराच होतात मुलं.'

तिनं हास्य केलं. गदळलेल्या चिखला-मळाचं रूप त्यात होतं. विझलेल्या इंगळाचं स्वरूप डोळ्यात आलं होतं.

अन् तितक्यातच बंगल्याबाहेर मोटर येऊन थांबल्याचा आवाज त्यांना ऐकू आला.

'आलाच लॉरी...' हर्षनिर्भर स्वरातच ती उद्गारली.

अन् काही क्षणानं लॉरी बुटाचा आवाज काढीतच आत येता येता म्हणत होता,

'मार्था... मार्था... काय झालय् ग ? की नेहमीचा स्वभाव... बनवायचंय् मला ? अं——' अन् तो दाराशीच एकदम थांबला. उठून उभा राहिलेल्या सायमनकडे त्याचं लक्ष गेलं.

'सायमन.....तू– तूच का ?' किती वर्षांनी ??'

दोन मित्र एकमेकाच्या मिठीत एकरूप झाले.

मार्थाला मात्र त्याचा हेवा वाटल्यावांचून राहीला नाही. आपल्या प्रीतीत हा वाटेकरी व्हावा.... असंतोषाची सूक्ष्म कीड तिचं मन कुरतडत राहिली.

लॉरीच्या मिठीतून मुक्त होता होता सायमनचं लक्ष तिच्याकडे गेलं. तिची विलक्षण मुद्रा बघून त्याला हसू आलं. तो थट्टेच्या स्वरात म्हणाला,

'लॉरी, यापुढं तू बायकोच्या समोर तरी मला मिठी मारू नकोस हं !'

'कां रे ?'

'तिला वाटायचं... आपल्यापेक्षा मित्रावरच तुझं अधिक प्रेम आहे. प्रीतीत वाटेकरी नको असतो, स्त्रीला.'

लॉरी खो खो करून हंसला. मार्थालाहि आपलं हसू आवरता आलं नाही.

★★

अन् सायमन नि मार्था नेहमी एकमेकाना भेटू लागली होती. त्यांची सलगी व्हायला वेळ लागला नव्हता. त्यांची वाढती मैत्री, मनमोकळं बोलणं, वागणं फिरणं लॉरीला बोचलं नाही. टोचलं नाही. हेवा वाटला नाही. आपण जितकं त्याच्यावर प्रेम करतो... तितकंच आपल्या बायकोनंहि त्याच्यावर करावं, असं लॉरीला वाटत होतं. तोच तिला म्हणाला होता,

'मार्था, सायमन परका नाही. आम्ही मित्र जीवाभावाचे. देहाकृति दोन पण दिल एकच. माझ्यासारखंच जिव्हाळ्यानं तू त्याच्याशी वागावंस. . .'

कधी कधी तिला बंगल्यावर यायला त्रास होई. लॉरी तिची वाट पाहत राही. आली की ती त्याच्या मिठीत बद्ध होई. त्याच्या गालावर आपली हनुवटी हळुवार घासल्यासारखी करीत ती विचारी,

'वाट पाहिलीस ?'

'थोडाच वेळ...' तिचं चटकन् चुंबन घेत तो म्हणे नि तिच्या देहाभोवतीचा आपल्या हाताचा विळखा दृढ करी.

'केव्हाशा आलास तू ?'

तिला वाईट वाटू नये म्हणून तो म्हणे,

'तुझ्या पुढं पाच दहा मिनिटंच ग ! कपडे उतरले. इथं येऊन बसलो नि तितक्यातच तूं आलीस.'

'वेळ झाला तुला यायला ?'

'हो. थोडंसं ऑफिसचं काम... तरी मी धांदलीतंच आलो. मला वाटलं तू आली असशील... नि काळजी करत बसशील. बरं झालं.... तूहि उशीरा आलीस.'

नेहमीप्रमाणे त्या दिवशी संध्याकाळच्या सुमारास सायमनची मोटर मार्थाच्या बंगल्यासमोर येऊन उभी राहिली. मोटर थांबतंता त्यानं ठराविक पद्धतीचा नि गतीचा हॉर्नचा आवाज काढला. असा त्यानं आवाज काढला की मार्था घाईघाईनंच दारात येऊन डोकावून हास्य करायची. मोठ्यानंच म्हणायची,

'आ ऽ ले ऽऽ सायमन ऽऽऽ पांच मिनिटं... तोपर्यंत ये तू आत.'

हॉर्नचा ठराविक आवाज काढून बराच वेळ झाला. त्याच्या दाराशी घोटाळणाऱ्या डोळ्याना मार्थाची मूर्ती दिसली नाही. नेहमीचे ठराविक शब्दहि त्याच्या कानावर आले नाहीत. त्याला याचं नवल वाटलं. तो गाडीतून उतरला. बंगल्याच्या पायऱ्या चट्कन् चढून आत गेला. तिच्या खोलीपाशी थांबला..... नि कॉलबेलच्या बटणवर बोट दाबलं.

'येस ऽऽ कम् इन ऽऽ' आतून मार्थाचा आवाज आला.

त्यानं दार लोटलं. पाहिलं....

'सॉरी...' असा उद्गार काढून तो झटकन् वळला.

ती नुसत्या अंडरवेअरनंच आरशासमोर उभी होती. चित्रकारापुढं अर्ध-उघड्या असलेल्या मॉडेलसारखी ती त्याला भासली होती.

'थांब, सायमन...' असं म्हणतच ती झपाटल्यासारखी त्याला जाऊन भिडली नि अर्धं उघडं दार तिनं लोटून एकदम बंद केलं.

चमकूनच तो तिच्यापासून दूर झाला.

'सायमन ऽऽ'

तिच्या हाकेतील ओली थरथर त्याच्या मनाच्या रुक्ष वाळवंटात हिरवळ रुजवून गेली; पण त्यानं आपलं मन आवरलं. सावरलं.

'वेळ होतोय्, मार्था...आता पिक्चरला जायचंय् ना ?'

'नाही...'

'कां ?'

'आज तू मला हवायस.'

'वेडी की काय तू, मार्था ?'

'तुझं तारुण्य, तुझं रुप... वेडं केलं त्यानं मला...'

'माझ्या मित्राची बायको तू–'

'भुरळ पडणं ही चूक का ?'

'आमच्यावर विश्वास आहे त्याचा–तो-'

त्याला, घट्ट मिठी आवळीत ती उद्गारली,

'मला एकच क्षण दे... तृप्तीचा... तुझ्या तारुण्याचा.'

'नको...नको मार्था. ते... तसलं दुर्दैव नको.'

अनुक्रमणिका






'एका क्षुद्र क्षणानं भूमि फुटणार नाही. आभाळ कोसळणार नाही, सायमन.'

'पण तुझ्या माझ्या वर्तनातल्या पावित्र्याला कलंक येता कामा नये...'

'सायमन...'

'नको... नको... नको, मार्था... तसं घडायला नको. ते दुर्दैव माझ्यावर तू लादू नकोस.'

'त्याला आमचा संशय यायचा नाही, सायमन. माझी इच्छा पूर्ण कर... एकच क्षण... एकच वेळ...'

'वेड्यासारखी वागू नकोस, मार्था. क्षणिक मोहानं बळी पडून जन्माचा पश्चाताप कवटाळू नकोस.' तिची मिठी सोडविण्याचा प्रयत्न करीत तो म्हणाला.

त्याला अधिकच कवटाळून धरीत ती विव्हळ, अगतिक स्वरात उद्गारली,

'नकोरे... दूर लोटू नकोस... दूर लोटू नकोस.'

मार्थाचं मार्थं पेटलं होतं. तिच्या शरीरांची नसन् नस तप्त झाली होती. तिला तो हवा होता. जे हवं ते तिला मिळवायचं होतं.

अन् मोटर बंगल्यासमोरच्या मोटारीच्या बाजूला उभी करून लॉरी खाली उतरला. नोकर दाराशीच उभा होता.

'सायमन आलाय् वाटतं ?'

'होय... बाईसाहेबाच्या खोलीत आहेत ते.'

लॉरी मार्थाच्या खोलीपाशी येऊन थांबला. त्यानं कोलबेलच्या बटणाकडे उजव्या हाताचं बोट नेलं. तसंच ते मागं घेतलं,

'सायमन, तुझ्यामुळं तरी माझी कूस ओली व्हावी....'

'मार्था, तुझं वर्तन, तुझं रूप इतकं उदात्त वाटतंय् मला की वाटतं मरावं नि तुझ्याच पोटी जन्मास यावं.... म्हणजे सगळं तुझं वात्सल्य, सगळी तुझी प्रीति मला लाभेल...'

लॉरीच्या गालावर स्मित पिस फिरवून गेलं. तो वळला. त्यांच्या बोलण्यात आपल्यामुळं व्यत्यय येऊ नयेसं त्याच्या मनात आलं. तो झराझरा बंगल्याच्या पायऱ्या उतरला. आपल्या मोटरमधे बसला. गाडी चालू करून ती त्यानं वेगानंच सोडली.

अन् काही वेळानं सायमन मार्थाच्या खोलीतून बाहेर पडला. त्यावेळी त्याची चर्या झिंगलेल्या माणसाची झिंगी उतरावी तशी दिसत होती. तो गुपचूप चालत होता. त्याच्या मागून ती आपल्या अंगातल्या गाऊनची रस्सी आवळीत चालत होती. दोघंहि एकमेकाची नजर टाळीत होती.

सायमनची मोटर निघून गेली... तरीहि ती तिथंच उभी होती. गाडी गेलेल्या दिशेला तिची भकास नजर लागली होती. अन् मग ती भानावर आली होती. जमिनीवर तिचं लक्ष गेलं होतं. व ती चपापली होती. सायमनच्या मोटरच्या बाजूच दुसऱ्या मोटरीच्या चाकांचा माग स्पष्ट उठलेला दिसत होता. चाकाच्या तळव्याच्या चौकटीच्या उमटल्या साखळीत तिचं मन चिरडत, वेढत गेलं.





अनुक्रमणिका

ती मोटर नुकतीच येऊन गेली होती हे ओळखायला तिला वेळ लागला नाही.

अन् एक साशंक कल्पना सर्पाकार बनत गेली.

नोकराला तिनं प्रश्न केला,

'गाडी कुणाची आली होती ?"

'मालकांची !'

'अं-? किती वेळ झाला ? '

'होईल अर्धातास...'

'माझ्या खोलीकडे कसे आले नाहीत ते ?'

'आपल्या खोलीपाशी थांबले होते ते. मी पाहिलं होतं... पण लगेच ते माघारे वळले. मोटारीत बसून निघून गेले.'

तिला वाटलं. . .आपल्या पायाखालची जमीन घसरत आहे. बंगला हालतो आहे. समोर दिसणारा आकाशाचा भाग कोसळतो आहे. तिच्या कपाळभर घाम दाटू लागला. तिचे नेत्र त्या चाकाच्या मागावरून सुसाट धावत पळत दूरवर गेले. अन् मग खालच्या अधरावर वरले दात घट्ट रोवून झट्कन् ती आपल्या खोलीकडे वळली. खोलीत यावेळी अंधार दाटला होता. तिनं दिव्याचं बटण दावलं. तिचं कॉटकडे लक्ष वेधलं.

उशा वेड्यावाकड्या झाल्या होत्या. त्या तिनं सारख्या केल्या. गादीवरली चादर चुण्याचुण्यानी चुरगळली होती, ती तिनं नीट केली. तिच्या केसातलं गुलाबाचं फूल कुस्करलं होतं...त्याच्या पाकळ्या चादरीवर पडून विचित्र स्मितानं तिला दिपवीत होत्या. त्या तिनं गोळा केल्या व खिडकीतून बाहेर फेकता फेकता तिचं आभाळाकडे लक्ष गेलं. आभाळाची निळाई ओशटली होती. माडांच्या शेंड्या शेंड्यात सावल्या चिडीचूप बसल्या होत्या नि समोरली चंद्रकोर कोयतीसारखी आपल्या गळ्याचा वेध घेत पुढं पुढं सरकत येत आहे. तिची तळपती धार... क्षणाचा भास... जीवाला थरकवून गेला होता. ★★



कॅलेंडरकडे पाहता पाहता मार्था चमकली होती. माहिना संपला होता. आठवडाहि संपला होता आणखी... तरी—

अभावितपणे तिचा उजवा हात तिच्या पोटावरून फिरला नि तिच्या कपाळभर थरारून घर्मबिंदू निर्माण झाले. तिला जे हवं होतं तेच— पण आता तसं नको होतं तिला... तसं घडायला नको होतं...

नेहमीसारखा सायमन येई. तिच्याशी बोले. ती दोघं फिरायला जात. सिनेमाला जात; पण पूर्वीचा त्यात जिव्हाळा नव्हता. ओलावा नव्हता. ओढ नव्हती. तिला एक आगळी वेगळीच व्यथा अस्वस्थ करीत होती.

त्या दिवशी संध्याकाळी सायमन आला. लांबवर ती दोघं फिरायला गेली... आली...

तो जायला निघालेला बघून तिनं चट्कन् त्याचा हात पकडला म्हटलं,

'इतक्यातच चाललास ?'

'हो...'

'आता जेवण करूनच जा ना...'

'च्...! भलताच आग्रह नको.'

'आज माझ्या सोबतीला जेवताना लॉरीसुद्धा नाही. उद्या यावेळी येईल तो... कदाचित् लौकरहि. तू रहाना... जेवण झालं की वसू थोडा वेळ बोलत नि मग तू जा...'

त्याला तिचा शब्द मोडवेना. परंतु साशंक मनानंच तो तिची हालचाल निरखीत राहिला. मागल्यासारखीच ती आपल्याला... छे: छे : ! तसं घडता कामा नये... केवढी चूक तरी केली आपण...! लॉरीला कळलं तर... अस्वस्थपणाचा भार त्याच्या डोकीवर आला.

ती दोघंहि मेजाजवळील खुर्च्यांवर बसली. नोकरानं जेवणाची मांडणी केली. दारूची बाटली व दोन काल्सी आणून नोकरानं मेजावर ठेवताच सायमन चमकला. त्याचं चमकणं लक्षात येऊनहि तिनं त्याकडे दुर्लक्ष केलं.

दोघानीहि एकेक काल्स दारू घेतली.

गप्पा मारीतच त्यांचं जेवण चालू झालं.

जेवण संपवून मार्थानं डिशमधलं एक केळं उचललं. सोललं. ती म्हणाली,

'सायमन, माझ्या इच्छेसारखी माझी कूस ओली झालीय्.'

सायमन एकदम दचकला. तोंडात घातलेला केळ्याचा तुकडा चघळून खायचं तो विसरला.

'काय—? तू... तू...' बोलता बोलता त्याला एकदम ठसका लागला.

चटकन् तिनं पाण्याचं ग्लास त्याच्या हाती दिलं. पाणी झटकन् पिऊन ग्लास समोर ठेवीत तो उद्गारला,

'भलतंच... विलक्षणच...?'

'नाही रे ! मला हवय तेच...'

'मूर्ख आहेस ! लॉरीला ही गोष्ट...'

'तितका विश्वास आहे माझ्यावर.'






त्यानं निःश्वास टाकला... नि चटकन् त्यानं बाटलीत उरलेली दारू समोरच्या रिक्त ग्लासात ओतली.

'अरे, जेवणानंतर काय हे ?'

'मला विसरायचंय् हे... सगळं विसरायचंय्...' असं म्हणून त्यानं ग्लास उचलून तोंडाला लावलं.

'काय हा अविचारीपणा...'

'दारूसारखाच अविचारहि... एकदा दारुचं व्यसन जडलं की सुटत नाही... एकादा अविचार घडला की पुन्हा–' असं अर्धवटच म्हणून तो खुर्चीवरून एकदम उठला.

'अं...! निघालास ?'

'हो... गेलं पाहिजे मला... या क्षणी !'

'थांब ना थोडा वेळ...'

'नाही—' झोकांडतच दाराकडे जाताना तो उद्गारला.

ती त्याच्या मागून धावली. त्याला मिठी आवळीत ती म्हणाली,

'तुला दारू चढलीयसं वाटतं, सायमन. अशा अवस्थेत तू जाऊ नकोस. इथंच रहा. झोप. सकाळी जा...'

'नाही– नाही... मला विसरायचंय् सगळं... विसरायचंय्.' असं म्हणतच त्यानं तिची मिठी जोरानंच सोडवली व तिला दूर झुगारून देऊन तो मोटारकडे झेपावला.

अन् ती स्वतःला सावरून गाडीकडे जाण्यापूर्वीच त्यानं गाडी चालू केली होती नि वेगानंच सोडली होती. तिनं मोठ्यानं किंचाळतच साद घातली,

'सायमन ऽऽ सायमन ऽऽ मागं फिर... मागं फिर... मागं फिर रे !'

ओठाची हालचाल झाली. पण शब्दांना आकार आला नाही.

**

सकाळी ती उठली. रात्री तिला बराच वेळ झोप आली नव्हती. ती खोलीबाहेर आली. डोळ्यावर जडपणा आला होता. आत आत आग रणरणत होती. जडावलेल्या देहानंच तिनं तोंड धुतलं. इतर विधी आटोपले. चहापिण्यासाठी ती मेजाकडे येऊन खुर्चीवर बसली.

नोकरानं चहाचं साहित्य आणून मेजावर व्यवस्थित मांडलं. त्याची चर्या तिला चमत्कारिकच वाटली.

'अशी चर्या कां तुझी रे ? झोप आली नाही की–'

'बाईसाहेब, दिस उगवता उगवता बातमी कळली..'

'बातमी–? कसली ?'

'विचित्रच !'

'तुझं कुणी...'

'माझं नाही... आपला सायमन–'

'त्याचं काय ?' तिच्या हाताप्रमाणेच स्वरहि कंप पावला होता.

'रात्री अपघात झाला त्याच्या गाडीला...'

'अं–? काय म्हणतोस ?' किंचाळून प्रश्न करावंसं वाटूनहि तिच्या मुखातून थरथरत पण मंद शब्द प्रश्नाकार घेऊन आले... 'कधी कळलं तुला हे ?'

'नुकतंच... लोक बोलतात... ते ऐकलं...'

'काय... सांगतोयस काय ?'

'अन् असंहि ऐकलय्... की त्याना हॉस्पिटलमध्ये नेता नेताच–' अस्फुट किंकाळी तिच्या मुखातून फुटली.

★★

सायमन अपघातात मृत्यु पावला... त्याला महिना झाला होता. मार्थाचं बोलणं, वागणं, चालणं, पूर्वीसारखं होत नव्हतं. सायमनच्या मृत्यूचा परिणाम तिच्या मनावर झाला आहे हे ओळखायला लॉरीला वेळ लागला नव्हता. तिचं हळवं मन त्याच्या मृत्यूच्या आघातानं दुबळं बनलं होतं. आपल्याला किती दुःख झालं त्याचं... तसंच तिलाहि !

'मार्था, दैवापुढं सगळं लटकं आहे...'

'असा त्याला मृत्यु येता कामा नये होता, लॉरी...'

'तुला वाटतं... मला वाटतं... परंतु तुझं माझं मन दैव बनत नाही. इलाज नाही त्याला.' लॉरी म्हणाला, 'सायमन फार चांगला होता ग. दैवाला ते बघवलं नाही.'

'होय... दैवानंच त्याला हिरावून नेलं आमच्यातनं.' असं म्हणून तिनं गळू पाहणारे डोळे झट्कन् पुसले... नि ती मग म्हणाली, 'होतं ते चांगल्यासाठीच... असं वाटतं मला.'

'काय?' तिचं बोलणं विचित्र वाटून आश्चर्यानंच त्यानं प्रश्न केला.

तिला आपल्या शब्दातली चूक कळून चुकली. मन आवरून, सावरून ती म्हणाली,

'मी त्याच्याशी बोले... त्याच्यावरोबर फिरे. ते आमचं सूत... भूतागत सतवलं असतना रे तुला त्यानं, लॉरी... नि आमच्या सुखमय, अमृतमय संसारात जहर कालवलं गेलं असतं विकारी विचारानी. तो प्रसंग टळला... खरंच, टळला रे तो.'

'नाही, मार्था... तुमच्या वागण्या, बोलण्यां... चालण्यात कसलंचं पाप नव्हतं. मला तसा चुकूनहि कधी संशय आला नाही. विषादहि वाटला नाही कधी तुमच्या मैत्रीचा. मी सायमनेला चांगला ओळखतो. एकवेळ तुझा तोल गेला असता कदाचित्... पण त्याचा गेला नसता. पण – एखादीचं दैव ! त्याला तसा अपघात घडावा... फार लौकर ईश्वरानं आठव केली त्याची.'

'होय... फार लौकर ! त्या दिवशी तो नेहमीसारखा आला होता. त्याला मी आग्रहानं जेवायला ठेवून घेतलं होतं. जेवण झाल्यावर लगेच तो गेला होता.'

'जेवणात दारू घेतली होती का त्यानं ?'

'मला दारूचा अत्यंत तिटकारा आहे... तुला माहीत आहेच. तुलाहि मी दारूला स्पर्श करू नको म्हणून सांगते सदा; पण तू जेवणात एक काल्स घेतोस. मलासुद्धा घ्यायला लावतोस. तुला वाईट वाटू नये म्हणून मी घेते. तुझ्या समाधानात मी बुडून जाते.'

'अपघात घडला त्या रात्री त्यानं दारू घेतली होती, असं तपासात आढळलंय्, मार्था. म्हणून विचारलं मी तुला. तुला दुखविण्यासाठी मुद्दाम बोललो नाही मी.'

यावर ती काहीच बोलली नाही. पण तिला वाटलं... आपल्या देहाचा तोल जातोय्. तिनं चटकन् लॉरीचा हात पकडला. त्यानं चमकूनच तिच्याकडे पाहिलं. तिच्या डोळ्याखालची वर्तुळं काळी पडली होती. खोल पण गडद दिसत होती. ते त्याच्या प्रथमच लक्षात येत होतं.

'काय झालं ग ?'

'गेला आठवडा भर असंच होतंय्... चक्कर आल्यागत... पोटात गदळल्यागत, देह जड झाल्यागत...'

लॉरी घाबरला. त्याला ते भलतंच जीवावरलं दुखणं वाटलं.

'चल... कपडे बदल बघू. डॉक्टरकडे जाऊ... की बोलावू इथंच ?'

'नको... तिकडेच जाऊ.'

ती कपडे बदलून त्याच्याबरोबर मोटरमधून डॉक्टरकडे गेली. डॉक्टरनं तपासलं. त्याची चर्या उजळ झाली.

'आनंदाची वार्ता आहे... मिस्टर...'

'आनंदाची ?' विस्मयचकीत दृष्टीनं डॉक्टरकडे पाहत लॉरीनं विचारलं. आपला जीव कोण धाकधुकीत नि हा करतोय आनंदाची वार्ता....

'हो... तुम्हा दोघात प्रीतीचा हक्काचा वाटा मागायला एक नवा पाहुणा यायचाय्...'

लॉरीनं खोलीतून बाहेर पडणाऱ्या मार्थाकडे मोठ्या कौतुकानं पाहिलं. ती मंदमंद पावलांनी पुढं पुढं येत होती. तिची नजर आपल्या पावलावर लागली होती. चर्या घामानं निथळत होती.

★★

पाळण्यात स्वस्थ झोपलेल्या बाळजीवाकडे पाहता पाहता ती एकदम चपापली होती नि नंतर दचकली होती. तिच्या गौरभाळी घर्मबिंदू तरारून गोळा झाले होते. तिला त्याचं नवल वाटलं होतं नि भयहि वाटलं होतं. अन् त्या आठवणीचं स्वरुप स्वतःच्या रूपानं त्यानं आपल्या हाती दिलं आहे . . . त्यानं आपला सूड उगवला आहे . . . असंच तिच्या मनात वादळी वातागत घुमत राहिलं.

काय झालं हे ?

दैवानं थट्टाच केली की आपली... पण किती क्रूरपणे !

विचारांच्या रगाडचात तिचं मन ऊसासारखं सांपडलं.

अन् तितक्यातच पावलाची चाहूल ऐकून तिनं वळून पाहिलं. लॉरी तिच्या अगदीच जवळ आला होता. त्याच्या हातात फुलांचे गुच्छ होते. पांढरी शुभ्र शेवंतीची फुलं... मंद परिमळानं दरवळणारी गुलछडीची फुलं... तिच्या भ्रमणाऱ्या मनाला एकदम खीळ लागली. तिला आठवलं... आज आपल्या बाळाचा नामकरण-विधी करायचं ठरवलं होतं. त्याला पांढरा स्वच्छ पोशाख घालून मोटरमधून चर्चमध्ये ती नेणार होती. रोझरी मातेला फुलं ती घालणार होती.






तिची चर्या त्याला विलक्षण वाटली.

'अं–? तुला काय झालं ?'

'काही नाही...' ओठातल्या ओठातच ती उद्‌गारली.

'नाही कसं ? मार्था–'

तिनं मंद निःश्वास टाकला. स्थिर नजरेनं तिनं त्याच्याकडे पाहिलं. अन् मग तिनं पाळण्याकडे दृष्टिक्षेप टाकला.

'आमच्या बाळाची चर्या कुणासारखी दिसते, लॉरी ?'

'आजच दिसली का तुला ?'

'आजच निरखून पाहिलं मी त्याच्याकडे.'

'मला पहिलंच जाणवलं ते.'

'लोक काय म्हणतील ?'

'वेडे, मी नवरा आहे तुझा... मी बाप आहे त्याचा. मी समर्थ आहे.. अन् त्याच्यासारखा तो दिसला तर त्यात नवल ते कसलं?'

'अं ?' थरथरता स्वर तिच्या ओठातच घुटमळला.

'तुझ्याजवळ त्यानं आपली इच्छा व्यक्त केली होती... आठवतं?'

'अं–?' अंतःकरणातली वाढती धडपड ती ऐकत राहिली.

'तुम्ही दोघं खोलीत बोलत होता त्या दिवशी...'

ती चपापली नि दचकली. मग गोंधळलेल्या मुद्रेनंच ती त्याच्याकडे पाहत राहिली.

'तू त्याला म्हटलं होतंस... तुझ्यामुळं तरी माझी कूस ओली व्हावी.. त्यावर त्यानं म्हटलं होतं... मार्था, तुझं वर्तन, तुझं रूप इतकं उदात्त वाटतंय् मला की वाटतं मरावं नि तुझ्याच पोटी जन्मास यावं– म्हणजे सगळं तुझं वात्सल्य, सगळी तुझी प्रीति मला लाभेल...'

दोन्ही हाताच्या पंज्यात आपलं मुख लपवीत ती कंपित स्वरात उद्‌गारली,

'तूं... तू ऐकलं होतंस, लॉरी ?'

'हो...'

'पुढं–'

'मी तुझ्या खोलीत न येता निघून गेलो.'

'त्याच क्षणी तू खोलीत कां आला नाहीस रे ?'

'तुमच्या निर्मळ बोलण्यात व्यत्यय आणावंसं वाटलं नाही मला.'

'केवढी चूक केलीस तू...'

'चूक–?'

'होय रे ! – मला निरंतर छळणारी... पिडणारी...'

'मार्था...'

'तो प्रसंग वांचला असता...नि–'

'वेडे, असं कां म्हणतेस तू ?'

तिला एकदम भडभडून आलं. अनंत वेदनानी विव्हळून ती म्हणाली–

'लॉरी, आमच्या बाळाची चर्या...'

'अग, त्याची तीव्र मनीषा. म्हणूनच तुला दिवस जाण्यापूर्वी महिनाभर आधी तो गेला नि तुझ्या पोटी जन्मास आला... तेव्हाहि घांदल केली... पूर्ण दिवसाची वाटहि पाहिली नाही त्यानं. त्याला तुझीच कूस हवी होती. कसं का होईना... इच्छेगत फळ मिळालं आम्हाला... त्याच्या वासनेप्रमाणं तो तुझ्या कुशीत...' बोलता बोलता तो एकदम थांबला. त्याचे नेत्र धुंद झाल्यासारखे झाले. अन् मग तो म्हणाला, 'गेली सात वर्षं... मोठ्या केविलवाण्या अवस्थेत घालवली होती मी, मार्था. मोठीच उणीव आमच्या आयुष्यात उरली होती. कामावरनं घरी यावं... तुझ्याबरोबरच एका चिमुकल्या बाळजीवाचं दर्शन घडावं. मन घडवी... पण दैव घडवीत नव्हतं. फक्त आशा... आशेचं खेळणं सोबती सहवासाला. त्यानंच इतके दिवस वाट बघण्याचं बळ दिलं. स्त्रीपुरुषाला मीलनामुळं सौख्याचा सागर मिळाला तरी त्यानं त्यांच्या जीवनाची पूर्तता होऊ शकत नाही. जीवनाचा, सौख्याचा खरा प्रकाश... मूल. त्या मुलावरच त्यांच्या आई बापाचं जीवन फुलत असतं. सौख्य बहरत असतं. मला वाटलं होतं... आमच्या नशिबी मुलाचं भाग्य नाही. दैवाला दोष देत दिनवाणं जीवन जगण्याचं अभाग्य लाभलं होतं; पण नाही. दैवालाहि वाटलं....अति अंत बघू नये... अन् सात वर्षानंतर या बाळानं...' वाक्य अर्धवटच टाकून तो थांबला. गालातल्या गालातच हसला.

तिच्या मनात आवेगानं आलं... त्याला किंचाळून म्हणावं... आक्रंदून सांगावं...

'तो बाळ तुझा नव्हे... तुझा नव्हे. तुझा काहीच अधिकार नाही त्याच्यावर. तो माझा आहे... माझा आहे तो. तो माझ्या इच्छे-वासनेचं फळ आहे. व्यभिचारामुळं झालेलं. तो त्यानं घेतलेला सूड आहे. नव्हे. माझ्या खांद्यावर त्यानं दिलेला तो जिता सूळ आहे.'

परंतु ती काहीच बोलली नाही. त्याची जी समजूत आहे ती बदलण्याची शक्ती आपल्याकडे नाही. ती कधी बदलणारहि नाही. ती तशीच ठेवायला हवी. अंतराला कातर लागली तरी ते तसंच गुप्त राखलं पाहिजे... असंच मग तिला वाटलं.

तिचं समोर लक्ष गेलं. क्रॉस खांद्यावरून वाहवीत नेणारी जिझसची मूर्ती... तिला ती अतिशय उजळलेली दिसली. त्याच्या मताच्या विरुद्ध असलेल्या माणसानी त्याच्या खांद्यावर तो सूळ दिला होता. सायमननं बाळाच्या रूपानं सूळच दिला नाही का आपल्याला ? तो आपल्याला वाहवीत नेला पाहिजे...आपल्या अंतापर्यंत तो नेला पाहिजे. या सूळाचं दुःख... आपल्या बाळाला कळणार नाही. आपल्या नवऱ्याला कळणार नाही. आपल्यालाच ते सगळं सोसलं पाहिजे. भोगलं पहिजे...

या विचारासरशी ती दचकली. कावऱ्याबावऱ्या नजरेनं तिनं लॉरीकडे पाहिलं. तो आपल्याच जगात धुंद होता. तिनं खोलखोल सुस्कारा टाकला. अंतरातल्या अनंत व्यथा दूर लोटण्याचा तिनं प्रयत्न केला.

अन् तितक्यातच पाळणं हाललं.

पाळण्यातला जीव जागा झाला होता. हातापायाची वळवळ तो करीत होता. अर्धमिटल्या लोचनाची मिची मिची हालचाल करीत होता.

त्याच्याकडे पाहता पाहता ती सगळंच विसरली... मनातला उद्वेग... शब्द... भावना... सगळंच. तिनं झटकन् पाळण्यात हात घातला. त्याला उचलून बाहेर काढलं. त्याला आपल्या छातीशी घट्ट कवटाळलं. ती पुटपुटल्यासारखी उद्‌गारली...

छे :! ओठच तिचे थरथरून हालले फक्त ! ●●●









# कहाणी नितम्बवतीची

—आनंद साधले



**दण्डि या कवीची दशकुमारचरित ही आख्यायिका माला प्रसिद्ध आहे. तिच्यातील सुगम मराठीत रूपांतरित केलेली एक कहाणी...**

**राजवाहन** ऐकत आहे.
मित्रगुप्त सांगत आहे.

महाराज ऐका.

मी पर्वत शिखरावर पोहोचलो. तेथे होते एक सरोवर. लोभसवाणे. ते मी पाहिले. मला मोह झाला. मी सरोवरात शिरलो. स्नान केले. तृप्त झालो.

मी आनंदाने बाहेर आलो. समोर पाहिले. तेथे एक ब्रह्मराक्षस उभा होता. तो म्हणाला,

"हा. हा. हा. कोण तू? माझ्या जलाशयात न्हातोस? आता मी प्रश्न करतो. तू उत्तर दे. नाहीतर मी तुला खाईन."

"करा प्रश्न महाराज."

"असाध्य गोष्टी कशाने साध्य होतात?"

"चातुर्याने."

"कशा?"

"सांगतो. ऐका. शूरसेन नांवाचा देश आहे. त्यात मथुरा नांवाची नगरी आहे. तेथे एक कुलवान कुटुंब होते. त्यात एक पुत्र जन्मला. त्याला लागली कलांची गोडी: आणि मग कलावतींची. नादच लागला. सुटेना. सुटेना. अति झाला. गणिकांचा तो नाद. अति झाला की काय होणार? भांडणे. तंटे. मारामाऱ्या. त्यात तो भाग घ्यायचा. आपणासाठी आणि मित्रांसाठी. अगदी नि:संकोचपणे. आणि नेहमी जिंकायचा. आपल्या दंडाच्या बळावर. म्हणून त्याचे नांव पडले कलहकंटक.

"तो कलावान. त्याला कलाकार नेहमी भेटत. असाच एकदा भेटला एक चित्रकार. त्याच्या जवळ एक चित्र होते. चित्रात एक तरुणी होती. छान छान! गोरी गोरी पान! भरलेली. फुगलेली. चित्र पाहिले. तरुणी पाहिली. आणि कलहकंटक गार झाला. आणि तापलाही.

"म्हणाला, 'सख्या, कोण रे ही. नवलाचीच खाण की रे! शरीरात मस्ती कशी? कुलीन स्त्रियाना दुर्मिळ अशी. पण चेहऱ्यावर नम्रता कशी? चांगल्या कुलाला शोभेल अशी. तोंड जरा फटक वाटते. नवऱ्याच्या बाबतीत भुकेली दिसते. अंबाडा तर घातलेला आहे. फुले तर माळलेली आहेत. नवरा तर केलेला आहे. गालांवर–ओठावर खुणाही आहेत. अर्थात नवरा घरीच आहे. म्हणजे तो म्हातारा असणार. हिला सुख देतच नसणार. मला संधी मिळेल काय? हिचे नांव गांव सांगतोस काय? सांग गड्या सांगच.'

"चित्रकार म्हणाला, 'सारे काही बरोबर ओळखलेस. हे तू मित्रा कसे जाणलेस? ऐक आता ऐक. उज्जयिनी म्हणून नगरी आहे. तेथे एक सार्थवाह आहे. त्याचे नांव अनंतकीर्ती आहे. त्याची ही भार्या आहे. हिचे नांव नितम्बवती आहे. नांव कसे सार्थ आहे! नांव कसे यथार्थ आहे! नांव असावे सोनूवाळी. हाती असावी कथलाची वाळी. तसे हिचे नाही. रूप म्हणजे रूप आहे. जसे काढले तसेच आहे.'

"एवढे ऐकले मात्र. मग कलहकंटक कशास थांबतो? नांव कळले. गांव कळले. रूप कसे ते डोळा देखिले. नवरा म्हातारा हे तर पटले. आता काय ऐकावयाचे? आता कशास थांबावयाचे? आयुष्य फार थोडे असते. उगाच वेळ घालवायचा नसतो. म्हणून कलहकंटक निघाला. उज्जयनीला येऊन पोचला. तेथे भिकाऱ्याचा वेष घेतला. आपले नांव भार्गव ठेविले. अनंतकीर्तीच्या घरी आला. 'बाई भिक्षा वाढा म्हणाला.' जे हवे ते पाहून घेतले आणि त्याला वेडच लागले. आणि त्याने बेत योजिले.

"तो नगरसभेत गेला. अध्यक्षास नमस्कार केला. म्हणाला, 'मी भार्गव. एक गरीब भिकारी. स्मशानात राहू का? स्मशानाचे रक्षण करीन. प्रेत वस्त्रांवर पोट भरीन'. अध्यक्ष म्हणाला 'ठीक आहे.' कलहकंटक मनात म्हणाला 'आता काम झाले रे झाले.' स्मशानाजवळ एक मठ होता. त्यात एक श्रमणिका होती. ती त्याने न्याहाळली. मनी खूणगाठ बांधली. प्रेतवस्त्रे जमा केली. सारी तिला नेऊन दिली. अशी तिला तृप्त केली. तिची कामावर योजना केली. तिला नीट पढविली. नितम्बवतीकडे पाठविली.

"नितम्बवतीने तिचे स्वागत केले. तिचे म्हणणे ऐकून घेतले. घरातून एक








**नितम्बवतीने तसेच केले....हा जाईचा मंडप....हा तो वाट पहात आहे–ही श्रमणिका येत आहे. मनोमोहिनीला आणित आहे.... ती आली....आणि अघटितच घडले....**

लाटणे आणिले. तिचें टकुरे सडकून काढले. आणि तिला घालवून दिले. ती बिचारी परत आली. तिने सारी वार्ता निवेदिली. तेव्हा कलहकंटकाने आणखी वस्त्रे आणली. ती तिला दिली. आणि खूप खूप शांतविली. मग तो म्हणाला,

'गडे तू भिऊ नकोस. मी सांगतो ते ऐक. तिच्याकडे परत जा. उद्याच जा. तिला म्हण, 'काल तू घाई केलीस. नीट ऐकून घेतले नाहीस. उगाच मला मार दिलास. अग मी आहे सन्याशीण. मी आहे मुमुक्षू. मी देवाच्या मार्गावरची. कुलवधूचे शील भंगो, असे मला वाटेल काय? मी तुझी परीक्षा घेतली. इतके फक्कड तुझे रूप! इतके मोठे तुझे वैभव! आता तू वयात आलीस. या वर्षात पोरी बहकतात. नको तो चावटपणा करतात. म्हणून म्हटलं तुझी चाल बघावी. तुझी थोडी परीक्षा घ्यावी. म्हणून माझी गुणाची वाळी फसली. पण परीक्षाही पास झाली. आता मी संतुष्ट झाले. तू म्हणशील, मी घरून उठून आले. मार खावून परत गेले. हे सारे कशासाठी? ऐक! तू रूपाची राणी आहेस. गुणांची खाणी आहेस. पण तुझे मातृत्व फळले नाही. तुझी कूस फुलली नाही. तुझे उदर भारावले नाही. त्याला मोठे कारण आहे. तुझ्या नवऱ्यावर भूत आहे. त्याला ग्रहाची पीडा आहे. ते ग्रह त्याला खातात. त्याला सदा दुर्बल राखतात. मग तो काय सुख देणार? तुला मूल कसे होणार? त्याला उपाय एकच. ग्रहाची शांती करणे. म्हणून माझे ऐक. हा तुमचा प्रासाद आहे. या मागे बाग आहे. तिच्यात जाईचा मंडप आहे. आज रात्री तू तिथे ये. अगदी एकटी एकटीच ये. माझ्या ओळखीचा एक मांत्रिक आहे. त्याला मी घेऊन येईन. तुझ्यासाठी हवे ते करीन. त्याला मी लपवून आणीन. त्याच्या हातात तुझा पाय दे. तो पायावर मंत्र घालील. त्याला शक्तीने भारून टाकील. मग तू घरात जा. प्रणय-कुपितेचे रूप घे. पतीला उरावर लाथ मार. मग भूत पळून जाईल. ग्रहांची पीडा संपून जाईल. मग तो नीट सुधारेल. त्याला चांगली पुष्टी येईल. तुला चांगली तुष्टी मिळेल. तुझी कूस मग फुलेल. असे तू तिला सांग. ती त्याला तयार होईल. मग तिच्याशी संकेत ठरव. मला लपवून बागेत ने. जाईच्या मळचात नेऊन बसव. तेथेच तिला घेऊन ये. पुढचे काम माझ्या-कडे. मी तुझा उपकृत होईन. तुझे उपकार खास मी फेडीन.'

"मग तिने तसेच केले. त्याच रात्रीचा संकेत ठरला. तो तर प्रीतीने फुलून गेला. रात्र आली. आता अडचण कशाची. हा जाईचा मंडप. हा तो वाट पहात आहे. ही श्रमणिका येते आहे. मनोमोहिनीला आणित आहे. ती आली. तिने पाय वर केला. हळूच त्याच्या हातात दिला. तो मंत्र म्हणू लागला. आणि . . . आणि . .

"त्याच्या हातात एक सुरी होती. त्याने चपळाई केली. तिच्या मांडीच्या वरच्या भागी सुरीचा वार केला. तिने पाय हिसकून घेतला. पण तो सावध होता. त्याने तिच्या पायातील नुपूर हिस-कले. आणि तो गेला. नाहीसा झाला.

फार फार दुखत होते. रक्त तर गळत होते. पण नितम्बवती करणार काय? ओरडून कुणाला सांगणार! तक्रार कुणा-कडे करणार? काय झाले म्हणून सांग-णार! चूप बसली. सुऽऽऽ म्हणाली. हाय म्हणाली. वळवळली. पण चूप राहिली. मग हळूच तळीवर आली. तिने जखम धुवून टाकली. वस्त्रात नीट बांधून टाकली. श्रमणिका मिळती तर जीव घेती. पण... पण. . उपाय नव्हता. दुसरे नुपूर काढून ठेवले. शिवायचे नाही जाहीर केले. तीन चार दिवस बाजूला बसली.

मग दारात आवाज आला, 'नुपूर घ्या नुपूर. विकावयाचे आहे. नुपूर घेणार काय.' तो आवाज अनंतकीर्तीने ऐकला. तो बाहेर आला. त्याने नुपूर पाहिले. ओळखिले. तो म्हणाला, 'हे नुपूर ओळ-खीचे. हे माझ्या बायकोचे. हे तुला कुठे मिळाले? तू तर चोर दिसतोस.' त्यावर कलहकंटक म्हणाला, 'मला चोर म्हणतोस? मी तुझ्याशी बोलणार नाही. चौकीवर चल. लोकसभेत बोलेन. होऊन जाऊ दे. तू काय समजलास?'

अनंतकीर्ती घरात गेला. नितम्ब-वतीस म्हणाला, 'तुझे नुपूर कुठे आहेत?' ती जराशी लाजली. जराशी मुरडली. आणि मग म्हणाली, 'रात्री फार उकडले. म्हणून मी बागेत गेले. तेव्हा नुपूर गळून पडले. एकच बरे का. एक माझ्याजवळ आहे. ते हे घ्या. दुसरे मी शोधले. पण मिळाले नाही. मी सांगणारच होते तुम्हाला रात्री.' अनंतकीर्ती म्हणाला, 'असे काय? चोर मिळाला आहे. चल त्याला हात दाखवू' म्हणून नूपूर घातले खिशात. तिला धरली हातात. आणि निघाला चौकीवर. कलहकंटकाला म्हणाला, 'चल रे. पाहू तुझा तमाशा.'

'मिरवणूक चौकीवर गेली. वाण्याने फिर्याद पुढे मांडली. लोकनेता कलहकंटकास म्हणाला, 'काय रे. हे तुझे उद्योग काय?' त्या धूर्ताने काय केले? विनम्र नमस्कार घातला. म्हणाला, 'सभ्य जनहो, आप-णास माहीतच आहे. आपण आज्ञा दिली आहे. मी स्मशानात रहातो. मी स्मशान राखतो. गरीब माणूस मी. कसेतरी पोट भरतो. मी माणूस प्रामाणिक. रात्री सुद्धा जागतो. रात्री सुद्धा स्मशान राखतो. परवा रात्री काय झाले? एक प्रेत चिते-वर चढले. ते नीट पेटले. चिता भडकली. प्रेतवाहक निघून गेले. तेवढ्यात एक

[पृष्ठ ४७ वर पहा]










# कोण करील याचा सन्मान?

—अरविंद ताटके

*'विजयादशमी' ही पराक्रमाची मुहूर्तमेढ. त्यानिमित्ताने स्वा. सावरकर यांच्यासारख्या थोर क्रांतिकाराच्या इतिहासविषयक कार्याची ही झलक. 'मृत्युंजय'या श्री. अरविंद ताटके यांच्या स्वा. सावरकर ग्रंथातील काही ओजस्वी ओळी आपल्यापुढे इतिहासकार सावरकर साकार करतात.*

"या केलेल्या आरंभापूर्वी अरबस्तानची स्थिती काय होती?"

"याचे पहिले पान फाटलेय्. त्यात असेल ते!" वडील आपल्या लहान मुलाला बोलले.

पंचाहत्तर वर्षांपूर्वी वडिलाना प्रश्न विचारणारा हा मुलगा म्हणजे पुढे 'अठरासे सत्तावनचे स्वातंत्र्यसमर' लिहिणारे स्वा. सावरकर. इतिहास त्यांना फार आवडायचा. लहानपणी 'शॉर्ट हिस्टरी ऑफ दी वर्ल्ड' हे पुस्तक हातात पडल्यावर त्याना कोण आनंद झाला! पण ते होते इंग्रजीत. त्यामुळे त्यांचा फार हिरमोड झाला. तेव्हा वडिलांच्या ते खनपटीस बसले अन् तो इतिहास त्यांनी त्यांना वाचण्यास सांगितला. त्या पुस्तकात होता अरबस्तानचा इतिहास. सावरकरांचे कुतुहल जागृत झाले अन् म्हणूनच वरील प्रश्न त्यांनी वडिलांना विचारला. त्या पुस्तकाची पाने फाटलेली असल्याने ते काही त्यांची जिज्ञासा पुरी करू शकले नाहीत.

वरील प्रसंगाच्या वेळी सावरकर असतील आठ-नऊ वर्षांचे. इंग्रजी शाळेत गेल्यावर पेशव्यांची बखर, भाऊसाहेबाची बखर, वगैरे बखरी अन् मेकॉलेकृत इंग्लंडचा इतिहासहि त्यानी वाचला. वि. को. ओकांचे सत्तावनच्या बंडावरचे 'शिपायांचे बंड' हे पुस्तक त्यांनी बाराव्या वर्षीच वाचले. त्यात ग्रंथकाराने शिपायांची केलेली निंदा पाहूनच पुढे त्यांना सत्तावनचे स्वातंत्र्यसमर ग्रंथ लिहिण्याची इच्छा झाली असावी. मॅट्रीकमध्ये गेल्यावर सरदेसायांची मुसलमानी रियासतहि त्यांनी वाचली. त्याशिवाय अकोडिया, असिरिया, बाबीलोन, स्पॅनिशमूर, तुर्की साम्राज्य वगैरे देशांचे इतिहासहि त्यानी मोठ्या आवडीने वाचले. टीपणे काढण्याची संवय त्याना तेव्हापासून होती अन् टिपणाना त्यांनी 'सारसंग्रह' असे नांव दिले होते. या सुमारास पुण्याच्या 'करमणूक' पत्राने ठेवलेल्या स्पर्धेत भाग घेऊन 'सर्व पेशव्यात थोर पेशवे कोणते व ते कां याची कारणे' या विषयावर पारितोषिकहि त्यानी मिळविले. सर्व पेशव्यांत अग्रमान त्यानी थोरल्या माधवरावाला देऊन लिहिले: 'पण ह्या अमोल वैजयंतिमालिकेत कौस्तुभमणीचे ठायी शोभणाऱ्या राव माधवरावांची थोरवी काही विलक्षणच' त्यांच्या लेखनातली प्रौढी अन् प्रतिभा या मॅट्रीकच्या वर्गात असताना लिहिलेल्या निबंधातहि पहावयास मिळते. श्री. रणजीत देसायांची 'स्वामी' कादंबरी मी वाचण्यास घेतली तेव्हा लहानपणी वाचलेल्या सावरकरांच्या त्या अप्रतिम निबंधाची आठवण मला झाली.

नाना फडनवीसांच्या शतसांवत्सरिक पुण्यतिथीनिमित्त त्यांच्या मूळ वेळास गावी 'ऐतिहासिक पुरुषांचे उत्सव कां करावे?' या विषयावर ठेवलेल्या स्पर्धेतहि सावरकरांनी प्रथम क्रमांक मिळविला होता. सतराव्या वर्षी चव्वेचाळीस ओळींचे 'श्री शिवगीत' त्यानी आर्यावृत्तात रचलेले आढळते. त्यावरून तरुणपणापासून त्यांच्या मनाच्या कपारीत इतिहासप्रेमाचा झरा कसा झुळझुळत

अनुक्रमणिका

होता त्याची कल्पना येते. त्यानी लिहिलेल्या सिंहगडाच्या अन् बाजीप्रभू देशपांड्यांच्या पोवाड्यातहि त्यांचे इतिहासप्रेम उफाळून आले आहे. अर्थातच स्वातंत्र्यप्राप्तीसाठी मागील इतिहासापासून स्फूर्ती घेऊन तरुणांनी जागृत व्हावे म्हणून प्रचारासाठी त्यांनी इतिहासाची कांस धरलेली दिसली तरी त्यात त्यांचे मूळचे इतिहासप्रेम काही लपत नाही.

काय योगायोग पहा. सावरकर विलायतेत बॅरिस्टरीच्या उच्च शिक्षणासाठी गेले (स. १९०६ ) तेच मुळी शामजी कृष्णवर्मांनी ठेविलेली 'शिवाजी शिष्यवृत्ति' मिळवून. तिकडे गेल्यावर ते पुण्याच्या 'काळ' पत्राला अन् मुंबईच्या 'विहारी' साप्ताहिकाला बातमीपत्रे धाडीत असत. 'लंडन टॉवर' या शीर्षकाखाली त्यानी 'विहारी'ला धाडलेल्या बातमीपत्रात तिथे असलेल्या वाघनखांविषयी लिहिताना त्यांची इतिहासाची आपुलकी व्यक्त झाली आहे. त्यात ते लिहितात: 'वाघनखे प्रदर्शनासाठी नसतात. त्यांना पारतंत्र्याची पोटे फाडण्यासाठीच कायती बाहेर काढणे इष्ट आहे. ज्याना ती वाघनखे पहाण्याची उत्कंठा लागलेली असेल त्यानी पारतंत्र्याची आंतडी उपसण्यास तयार असले पाहिजे.' या सगळ्या बातमीपत्रात वरवर शिवाजीच्या वाघनखांविषयी मजकूर आहे. पण त्याच्या द्वारा पारतंत्र्य कसे नष्ट करता येते हाच मुद्दा अन् मंत्र त्याना वाचकांच्या गळी उतरावयाचा आहे. नुसत्या घटना सांगण्यासाठी ते इतिहासाकडे चुकूनहि वळत नाहीत. स्वातंत्र्याची वाट शोधण्यासाठीच इतिहासाची मशाल ते घेतात ही गोष्ट वरील बातमीपत्रात दिसते. किंबहुना त्यांच्या इतिहास ग्रंथात पारतंत्र्याविषयी चीड अन् स्वातंत्र्याविषयी चेतावणी दिलेली आढळते. आमच्याकडील बहुतेक इतिहास संशोधक अन् सावरकर याच्यांत भेद आहे तो हा. 'सत्तावनचे डोहाळे', 'लंडनमधील पहिला शिवोत्सव', श्री गुरु गोविंदसिंह महाराजांचा जन्मोत्सव या साऱ्या बातमीपत्रांत त्यांचे इतिहासप्रेम स्वच्छपणे पहावयास मिळते.

विलायतत पहिला 'शिवोत्सव' सावरकरांच्याच अध्यक्षतेखाली झाला. त्याविषयी त्यांच्या बातमीपत्रात किती जिव्हाळा व्यक्त झाला आहे तो पहा—'मनुष्ये मरतात पण त्यांची सत्कृत्ये जिवंत राहतात.......शिवनेरीच्या डोंगरात १६२७ त जन्मलेले बालक १९०८ साली जिवंत आहे, तारुण्यभरात आहे, दिग्विजयात दंग आहे, नवीन भाषांना मोहीत आहे व नवीन कंठातून, हृदयात, वाङमयातून त्यांची सिंहासने व त्यांचे जयजयकार दुमदुमत चालले आहेत! काळाइतकेच अमर्यादित अमरत्व कोणास पाहिजे आहे काय? असेल तर एक उपाय म्हणजे स्वदेश स्वातंत्र्याच्या रणांगणात त्याने हरहर म्हणावा! कधीहि मरण न येण्याचे एक साधन म्हणजे स्वदेश स्वातंत्र्यास्तव तत्काल मरण हे होय! असा न मरण्यासाठी जो मेला त्या शिवभूपाच्या जयजयकाराने लंडन शहर गेल्या आठवड्यात प्रथम निनादन पावले.' विषय आहे शिवोत्सवाचा पण आत ठासून दारू भरली आहे स्वातंत्र्य संपादन करण्यासाठी उठाव करण्याची. सावरकर इतिहासात रमतात तेव्हा हरदासाच्या मूळकथेप्रमाणे ते नेहमी स्वातंत्र्याच्या प्रश्नावरच येऊन थांबतात. १९०८ साली त्यानी तिकडे अठराशे सत्तावनचा उत्सव केला. त्यावेळी सत्तावनच्या संग्रामास अर्धशतक लोटले होते. उत्सव तर अगदी जंगी झाला. प्रसाद म्हणून चपात्या वाटल्या. पण त्याविषयी बातमीपत्रात ते काय लिहितात ते पहा: 'चपात्याच प्रसादासाठी अशाकरता वाटल्या की सत्तावनचे क्रांति–युद्धाचे आधी अशाच 'चपात्या' देशभर गुप्तरूपाने वाटल्या होत्या'. तेव्हा या साऱ्या उत्सवाचे खरे कारण त्यानी चपात्यांची आठवण देऊन सांगून टाकले आहे. इतिहासकार म्हणून त्यांची मनोभूमी कशी बनत गेली ते आपण आतापर्यंत पाहिले. आता त्यांच्या ग्रंथांकडे वळूया.

विलायतेत गेल्यावर सावरकरांनी अठराशे सत्तावनच्या स्वातंत्र्यसंग्रामाला अर्धशतक लोटल्याबद्दल त्या विषयावर ग्रंथ लिहिण्याचे ठरविले. त्यासाठी त्यानी वशिला लावून ब्रिटिश सरकारच्या 'इंडिया ऑफिस'च्या ग्रंथालयात बसण्याची परवानगी मिळवून तिथले सत्तावनविषयक बरेचसे ग्रंथ वाचून काढले. नंतर बाहेर तरुणांना त्याविषयी ते व्याख्यान देऊ लागले. ही बातमी जेव्हा सरकारला कळली तेव्हा 'इंडिया ऑफीस'चे ग्रंथालय त्याना बंद झाले. पण एवढ्या अवधीत त्यांनी ग्रंथ लिहून पुराहि केला होता. प्रथम तो मराठीत लिहिला. छापण्याच्या अडचणी विचारूच नका. छापण्यापूर्वीच त्यावर बंदी आली. मराठी छापण्याचे जमेना तेव्हा ग्रंथाचे इंग्रजी भाषांतर करून तो हॉलंडमध्ये छापण्यात आला. या पहिल्या आवृत्तीच्या छपाईचा खर्च दादासाहेब खापर्डे व साताऱ्चे दादासाहेब करंदीकर यानी सोसला. त्यानंतर अमेरिकेत गदर पक्षाने त्याची दुसरी आवृत्तीहि काढली. अर्थात या 'इंडियन वॉर ऑफ इंडिपेन्डन्स्'च्या प्रती गुप्तरूपानेच सर्वत्र वाटल्या, विकल्या जात, प्रचार होई. पुढे सरदार भगतसिंगानी दोन वेळा व सुभाषबाबूंनी जपानात सेना उभारली तेव्हा रासबिहारी बोसनीहि त्याची नवी आवृत्ती काढली होती. क्रांतिकारकांनी अन् देशभक्तानी या ग्रंथाकडे 'गीते'च्या भक्तिभावाने पाहिले. ब्राझीलमध्ये या ग्रंथाची एक प्रत दोनशे रुपयालाहि विकली गेली. सरतेशेवटी २२ मे १९४६ साली या ग्रंथावरील बंदी उठल्यानंतर ढवळे प्रकाशनाने निर्बंधमुक्त अशी इंग्रजी आवृत्ती प्रसिद्ध केली. १९६५ साली सावरकरांनी स्वतः लिहिलेला मूळ मराठी ग्रंथ 'अठराशे सत्तावनचे स्वातंत्र्यसमर' या नांवाने प्रकाशित झाला. एकंदरीत त्यांच्या या ग्रंथाचा इतिहास असा नाट्यमय आहे.

सत्तावनचे युद्ध हे बंड नसून स्वातंत्र्ययुद्ध होते हा सिद्धांत सावरकरांनी या ग्रंथात प्रथम मांडला. आता जस जसे नवीन कागदपत्र उपलब्ध होत आहेत व संशोधनाची वाढती व्याप्ती पाहता त्यानी या ग्रंथात मांडलेले सगळेच विचार अभ्यासकांना पटतीलच असे नाही. मतभेदाच्या जागा बऱ्याच सांपडण्यासारख्या






आहेत. तथापि त्याकाळी विलायतेत ब्रिटिश सिंहाच्या गुहेत शिरून मिळालेल्या साधनांच्या सहाय्याने हा ग्रंथ लिहून सत्तावनचा उठाव म्हणजे स्वातंत्र्ययुद्धच हा सिद्धांत त्रिखंडात प्रथम मांडण्याचे धैर्य सावरकरांनीच दाखविले ही गोष्ट मोकळ्या मनाने कबूल करण्यास कुणीहि खळखळ करू नये. या विषयावर आता नवीन ग्रंथ होत असले तरी सावरकरांच्या ग्रंथाची लोकप्रियता अजून टिकून आहे. आमच्याकडील संशोधकांना, अभ्यासकांना हा ग्रंथ प्रचारात्मक वाटतो. त्याला इतिहास म्हणण्यास ते तितकेसे राजी नाहीत. आमच्या का. न. केळकरांसारखे या विषयावरील अधिकारी अभ्यासक सावरकराचा ग्रंथ वाचण्यासहि तयार नाहीत. अर्थात् या अढ्या गुणग्राहतेच्या अभावीच आहेत. आता या विषयावर नवीन ग्रंथ प्रसिद्ध होत असले तरी साठ वर्षांपूर्वी सावरकरांनी मांडलेला सिद्धांत कुणालाहि खोडता आलेला नाही अगर ग्रंथात नवीन माहितीहि फारशी देता आलेली नाही. या विषयावर 'भारताचा शोध' या आपल्या ग्रंथात पंडित जवाहरलालजींनी मतभेद व्यक्त केला असला तरी १५ ऑगस्ट १९५७ रोजी लाल किल्ल्यावरून भाषण करताना, नांव न घेताहि त्याना सावरकरांचाच सिद्धात कबूल करावा लागला. ते त्यावेळी म्हणाले : 'इतिहासकारांनी ह्या शंभर वर्षांतील घटनांवर अनेक ग्रंथ लिहिले आहेत. अजूनहि अनेक लिहित आहेत. इतिहासकार काहीहि म्हणोत. १८५७ साली त्याकाळच्या साम्राज्याविरुद्ध अखिल भारताने उठाव केला. या दृष्टीने त्या स्वातंत्र्ययुद्धाकडे अखिल भारतीय आदराने पहात आहेत. दिल्लीचा बहादूरशहा, झांशीची राणी लक्ष्मीबाई, नानासाहेब पेशवे, सेनापति तात्या टोपे या महान् वीरांनी आपल्या रक्तानी भारतभूस स्नान घातले व स्वातंत्र्ययुद्धाची मशाल पेटविली'. ऐतिहासिक विषयाला हात घालण्याचा सावरकरांचा मूळ हेतु मी प्रथमच सांगितला असला तरी त्यांच्या अठराशे स्वातंत्र्यसमरातल्या ग्रंथातला सिद्धांत अजूनहि कसा कायम आहे त्याची साक्ष जवाहरलालजींच्या भाषणात दिसते.

सावरकरांचा हा ग्रंथ खुलेपणाने प्रसिद्ध झाल्यावर त्यावर तात्यासाहेब केळकरांनी 'सह्याद्रि'त (मार्च १९४७) लिहिले : 'केवळ शिपायांचे बंड या नांवाने निळ्या रक्ताच्या गोऱ्या इंग्रज ग्रंथकारांनी सतत उल्लेखिलेल्या आणि त्यावरून हिंदी लोकांच्या तोंडीहि तोच शब्द रूढीने बसलेल्या ग्रंथाचे तात्पर्य वेगळ्या तऱ्हेने सांगणारा म्हणजे ते बंड नसून क्रांतियुद्ध होते असे प्रतिपादणारा हा म्हणजे सावरकरांनी लिहिलेला ग्रंथ अपूर्व व पहिलाच ठरतो' या विषयावर काही बाबतीत मतभेद असूनहि आपले प्रांजळ मत याविषयी केळकरांनी दिले. आचार्य अत्र्यांनी तर त्यावेळी 'नवयुगात' या ग्रंथावर 'मला खून चढला' हा खास लेख लिहून त्यात म्हटले : 'एखाद्या तप्त कढईत जसे तेल उकळत असावे तसे माझे रक्त शरीरात उसळ्या मारीत आहे.' तात्पर्य काय तर अनेक मतभेद अनेकांनी व्यक्त केले असले तरी सावरकरांच्या या ग्रंथाची मोलिकता अन् महत्व कायम आहे.

सावरकरांचा 'अठराशे सत्तावनचे स्वातंत्र्यसमर' ग्रंथ अत्यन्त चटकदार असून राणी लक्ष्मीबाई, नानासाहेब पेशवे, तात्या टोपे, कुंवरसिंह, बहादूरशहा वगैरेंची त्यातली व्यक्तिचित्रे इतकी बहारदार आहेत की ग्रंथ एकदा हातांत घेतला की खाली ठेववत नाही. झांशीच्या राणीच्या निधन प्रसंगीचे वर्णन तर डोळ्यात अक्षरशः पाणी आणते. 'लक्ष्मीराणी आमची आहे हे म्हणण्याचा मान मिळणे दुष्कर आहे. इंग्लंडच्या इतिहासाला तो मान अजून मिळाला नाही.' 'तात्या असल्या दुर्दैवी देशात तुम्ही कशाला जन्म घेतलात? आणि 'आमच्या वीरांच्या अंतःकरणात हिंदुस्थानची तलवार धारदारच राहिल आणि एक दिवस असा येईल की ती प्रत्यक्ष लंडनचे दरवाजे ठोठावील' हा रणघुमाळीत उठलेला बहादुरशहाचा हुंकार वगैरे वाक्यांनी अन् प्रसंगांनी आपल्या अंतःकरणात कालवाकालव होते. अन् म्हणूनच लोक कवि मन मोहनना पुढील काव्यपंक्ति रचल्याशिवाय रहावले नाही:

**मग 'कानू' शिकता–शिकता । इतिहास पहाया लागे**
**सत्तावनच्या बंडाशी । रंगले जिवाचे धागे**
**ते बंड नव्हे क्रांती ती । अंतःस्वर त्याला सांगे**
**घेतले कलम हातात**
**रणगाथा लिहिली ज्यात**
**हातावर पडले हात**
**पिस्तुल घे स्फुल्लिंगाला । अस्मान कडाडुन गेला**

केवळ हा ग्रंथ लिहूनच सावरकर थांबले नाहीत तर रत्नागिरीहून मुक्त झाल्यावर त्यांनी सत्तावनच्या स्वातंत्र्यसमरावर अनेक व्याख्याने दिली, त्यांतल्या योद्ध्यांची चरित्रे त्यांनी जाहीर सभांतून इतक्या उत्कटपणे सांगितली की सभा नुसत्या मंत्रमुग्ध होत. सत्तावनचा विषय त्यांच्या रक्तातच जणु भिनला होता. अलीकडे आपल्याकडे या विषयावर काही ग्रंथ प्रसिद्ध झाले पण त्या ग्रंथकारांनी जाहीरपणे क्वचितच तोंड उघडले. सत्तावनच्या शताब्दी उत्सवाला सावरकर दिल्लीस गेले तेव्हा झालेल्या सभेत बोलण्यासाठी पंडित जवाहरलालनाहि बोलाविले होते. पण ते गेले नाहीत. निमंत्रिकांना त्यांनी कळविले: 'सावरकर शूर असून










फार मोठे गृहस्थ आहेत. मी विलायतेत शिकत असताना त्यांच्या अठराशे सत्तावनच्या ग्रंथापासून आम्हाला स्फूर्ति मिळाली. तो ग्रंथ अद्वितीय असल्यामुळे अनेक भारतीयानी त्यापासून स्फूर्ति घेतली' एवढेच लिहून ते थांवले तर चालले असते. पण त्यांच्या शेवटच्या वाक्याने आधीच्या त्यांच्या वक्तव्यावर बोळा फिरविला जाऊन त्यांच्या हातून औचित्यभंगाचा प्रमाद घडला. शेवटी त्यांनी लिहिले: 'त्याला इतिहास क्वचितच म्हणता येईल'. सावरकर अन् जवाहरलालजी हे दोघेहि इतिहासकार. दोघांचे दृष्टीकोन वेगळे. कधीहि भेट न झालेल्या या दोन इतिहासकारांची भेट होण्याचा योग सत्तावनच्या शताद्बीच्या निमित्ताने आला होता, तो पंडितजींनी दवडला असेच कोणीहि इतिहासप्रेमी म्हणेल.

सावरकरांचा दुसरा ग्रंथ हिंदुपदपादशाही. शिवाजीपासून ते मराठेशाहीच्या अखेरीपर्यंत त्यानी मराठेशाहीचा इतिहास आपल्या ओजस्वी भाषेत त्यात सांगितला आहे. मराठे. केवळ महाराष्ट्रासाठी लढले नाहीत तर हिंदुस्थानभर आपले स्वराज्य स्थापने करावे, एक हिंदु राष्ट्र निर्माण करावे अशी त्यांची महत्वाकांक्षा होती असा सिद्धांत त्यानी या ग्रंथात काढला आहे. याशिवाय त्यानी शिखांचा इतिहासहि लिहिला होता. पण तो कुठे गहाळ झाला. ज्यानी त्यांची 'मूर्ति दुजी ती' ही कविता वाचली आहे व त्यात सांगितलेला बंदावीराचा नि त्याच्या पुत्राचा काव्यबद्ध संवाद ज्यानी वाचला आहे त्यांनाच सावरकरांनी लिहिलेला शिखांचा इतिहास किती सुरस अन् सरस उतरला असेल त्याची कल्पना येईल. त्यांचे 'कमला' काव्यहि पानिपतच्या पार्श्वभूमीवर आधारलेले आहे तर त्यांचे 'संगीत उत्तरक्रिया' हे ऐतिहासिक नाटक थोरले माधवराव पेशव्यांच्या काळावर आहे. यावरून इतिहास विषयावरील त्यांची प्रीति दिसून येते. त्यांच्या 'रणशिंग' या छोटया ग्रंथातील बहुतेक लेख इतिहासविषयक असून त्यात त्यांच्या अभ्यासाचे अन् सखोल व्यासंगाचे दर्शन घडते. 'हिंदुराष्ट्राच्या इतिहासातील सहा सोनेरी पाने ' या त्यांच्या अलीकडच्या ऐतिहासिक ग्रंथातहि त्यांचा व्यासंग छानपणे दिसतो. प्रचारासाठी ते इतिहास राबवितात असे आपल्याकडील संशोधक श्री. य. न. केळकरांचे म्हणणे असले तरी 'सावरकर हेहि इतिहासकारांच्या यादीत बसू शकतील. ते कवि व नाटककार, दोन्हीहि असल्यामुळे Constructive genius जी इतिहासकाराला आवश्यक असते ती त्यांचेजवळ आहे. वर्ण्य विषयाचा उत्कट अभिमान व त्याच्याशी तद्रुप होण्याची पात्रताहि त्यांचे ठायी नि:सीम आहे' अशी कबुली एका व्याख्यानात त्यानी दिलेली आढळते.

काय गंमत पहा: १९३८ साली सावरकर साहित्य संमेलनाचे











अध्यक्ष झाले तेव्हा निवडणूक स्पर्धेत त्यांना रियासतकार सरदेसायांशी सामना द्यावा लागला. त्यात ते विजयी झाले. अध्यक्षीय भाषणात त्यानी सरदेसायांच्या इतिहास कार्याचा गौरव केला, त्यांच्या रियासतीची त्यानी महती गायली. कारण सरदेसायांबद्दल त्यांना अत्यादर होता. आपल्या भाषणाच्या अखेरीस शस्त्रबळाचे महत्व सांगताना त्यांनी उदाहरणे दिली तीहि पेशवाईतल्या पहिल्या अन् दुसऱ्या बाजीरावाची. एकूण काय त्यांना इतिहास विषयात अतिशय रस होता असे दिसते. रानडयांचे 'राईज ऑफ दी मराठा पॉवर अन् राजवाडे खरेशास्त्र्यांचे ग्रंथ' त्यांनी अभ्यासपूर्वक वाचले होते अन् म्हणूनच या इतिहास भक्तिमुळे सत्तावनच्या वादग्रस्त विषयावर, मिळालेल्या सांधनांनिशी नवीन सिद्धांत मांडन त्यानी ग्रंथ लिहिला. त्यामुळे लोकांना त्या विषयाची एक वेगळी बाजू समजली. ही नवी दृष्टी दिल्याबद्दल अभ्यासकांनी त्यांचे ऋण अवश्य मानले पाहिजे. नाहीतर गाडाभर संशोधित कागदपत्रांचे भांडार संग्रही असूनहि आमच्या पद्मभूषण पोतदारांना शिवचरित्र लिहा असे सरकारला सांगावे लागते अन् तेहि कालहरण करीत लिहितो, लिहितो असे वायदे देत रहातातच. आमच्या संशोधनाची ही एक शोकांतिका असल्यामुळे सावरकरांचे ऐतिहासिक ग्रंथ साहाजिकच डोळयात भरतात. त्यांचा सत्तावनचा ग्रंथ भारतातल्या त्या विषयावरच्या ग्रंथात आपल्या वैशिष्ट्याने खासच उठून दिसतो तो ह्यामुळे.

सावरकर रत्नागिरीस असताना एकदा रियासतकार सरदेसाई त्यांना भेटण्यास गेले. आधीची काही ओळख नसल्याने सावरकरांनी म्हटले, "कोण आपण?"

"मी तो बडोद्याचा सरदेसाई, इतिहास लिहितो म्हणून आपणास ठाऊक असलेला."

"म्हणजे रियासतकार की काय?" सावरकर बोलले.

"होय".

"आपली सगळी पुस्तके मी वाचून काढली आहेत. आपण लिहिलेल्या मराठी इतिहासाचे संकलन केलेला अधिकृत, एकटाकी, साधार नि आटोपशीर असा इतिहास आपण स्वतः इंग्रजीत लिहावा म्हणजे महाराष्ट्रीय नसलेल्या जगालाहि तो सत्य स्वरुपात कळेल" सावरकर म्हणाले. "ते कार्य आता दुसऱ्यानी करावे" सरदेसाई बोलले. "नाही. आज तरी आपणच एक अधिकारी लेखक मला दिसता. अशा थोर इतिहास लेखकाचे दर्शन आज मला झाले याचा मला आनंद वाटतो." "छे. छे. खरा आनंद वाटतो मला! आम्ही काही झाले तरी इतिहासलेखक. पण आपण इतिहासकार. इतिहास घडविणारे. आपण इतिहास घडविल्यावर तो टिपून ठेवणारे आम्ही. मी खरोखरच आज, आपणास इतिहासकर्ते म्हणून भेटावयास आलो" सरदेसाई बोलले.

स्वातंत्र्यवीर सावरकर अन् रियासतकार सरदेसाईंच्या झालेल्या या भेटीची मला आठवण झाली की सावरकरांचा सत्तावनचा ऐतिहासिक ग्रंथ माझ्या डोळ्यासमोर येतो. रियासतकारांनी त्यांना म्हटलेल्या "आपण इतिहास घडविणारे आहात" या शब्दांचेहि मला स्मरण होते अन् मग माझे मन माडगुळकरांच्या पुढील काव्यपंक्ति गुणगुणू लागते:

**साहित्यातुन सहकाऱ्यांना घाली तो साद**
**वंगदेशि तो उठे क्रांतीचा दिव्य शंखनाद**
**चिरंजीव हा हौतात्म्याचा विजयी अभिमान**
**इतिहासाविण कुणी करावा याचा सन्मान**

•••





अनुक्रमणिका

# नैनं दहति पावकः

—सौ. यमुना शेवडे

*तुझं सौंदर्य एक स्वप्न होतं. तो गतकाल होता. तो काळहि किती भराभर मागेमागे जात आहे. खरंच तू कधी सुंदर होतीस का? मला तर आठवत नाही ! यापूर्वी तू कशी होतीस ?*

**या** घटकेपूर्वीची तुझी मूर्ति आठवण्याचा मी प्रयत्न करीत आहे. सुडौल असा बांधा. पाणीदार डोळे. आकर्षक चेहरा. कलापूर्णता व सौंदर्याभिरुची तुझ्या रूपानं आकाराला आली होती. चालणं झोकात, वागणं तालात, बोलणं बेतात, जेथे जायची तेथे आपल्या व्यक्तित्वाचा सुगंध भोवताली विखरत. स्वतः मधील सहजसुलभ अशा मार्दवाची पखरण करीत.

आज कितीतरी महिन्यांपासून तुला एकच ध्यास होता. तू संसार थाटण्यास निघणार होतीस. नव्या नवलाईचा, सातासमुद्रापलीकडे. तुझं मन आनंदानं मोहरून निघालं होतं. भविष्याची सोनेरी स्वप्नं तुझ्या नेत्रात तरळत होती. त्या दीप्तीनं तुझा चेहरा उजळला होता. उल्हासाला उधाण आलं होतं. प्रत्येक वस्तूच्या निवडीत तुझा चोखंदळपणा होता. काय घेऊ नि किती घेऊ? तयारी संपता संपत नव्हती. कुठल्या ना कुठल्या कारणानं जाण्याचा क्षण लांबणीवर पडत होता. एकेक दिवस तुझ्यासाठी युगासारखा होता. पण युगं वाढत होती. दिवसाचे महिने, महिन्याचं वर्ष. . . क्षणात आशा, क्षणात निराशा. हेलकावे बसत होते. तुझ्या मनाची अवस्था विकल होत होती. जिवाची तगमग. तडफड. पण तू सोसत होतीस. मानीपणानं, धैर्यानं, शौर्यानं. आत ज्वालामुखी धुमसत होता. तू बाह्यात्कारी शांततेचं पांघरुण पांघरलं होतंस. शेवटी एकदाचा तो मंगल दिवस समीप आला. तारीख नक्की ठरली. आता वर्ष नाही, महिने नाही, फक्त काही दिवसांचा अवकाश. . . . .

अन् आज हे अमंगल घडलं. मंगल अमंगल, शुभ अशुभ हातात हात घालून आलं जणू ! काय झालं हे? अपघात? कसा झाला? कां झाला? का आजपर्यंत आत दडवलेला अंतस्थ ज्वालामुखी वर उसळला. मीलनाची मंगल घटिका जवळ आली असता हे अमंगल घडलं कसं? अन् तेहि तुझ्यासारख्या सात्विक सोज्वळ व्यक्तीच्या बाबतीत! गगनाला गवसणी घालण्याच्या आकांक्षा होत्या का तुझ्या? मुळीच नाही. वास्तविक तुला काहीहि अशक्य नव्हतं. परीक्षांतून तू आपल्या बुद्धीची चमक दाखवलीस. रंगभूमीवर चमकण्याची धमक तुझ्यात होती. पण तसल्या कुठल्याच आकांक्षा तुझ्या नव्हत्या. ज्यांना आकांक्षाहि म्हणता येत नाही अशा साध्यासुध्या, संसार करण्याच्या, चिमुकल्या घरकुलाच्या, व्यक्तित्व विकासाच्या तुझ्या कल्पना नव्हत्या. जीवनात तुझी भूमिका घेण्याची नव्हती. देण्याची होती. देण्यात तुला सुख वाटे. घेण्याची कल्पनाहि कधी तुला शिवली नाही. व्यक्तित्वाच्या विलिनीकरणातच तू विकास पहात होतीस. जिच्यासाठी अनेकांची स्पर्धा लागावी ती तू आपण होऊन सर्वस्वाचं दान करण्यास आतुर होतीस. दानासाठी सर्वस्वाचा कलश घेऊन उभी होतीस प्रतीक्षा करीत ! जगात तुझ्यासारखे दाते क्वचित. घेते असंख्य. पण तुझ्या बाबतीत सारं विपरीतच घडायचं होतं. तुझ्या दानाचा स्वीकारच व्हायचा नव्हता. घेणाऱ्याची व तुझी गांठच पडायची नव्हती. लग्नात गांठ पडली तीच पहिली. अन् शेवटची. पदराची ही गाठ सोडवून दूरदेशी निघून गेल्यावर तुझ्या पदरी उरली ती तीव्र





अनुक्रमणिका

वेदना. ती वेदना आपल्या उरात दडवून रोजच्या अश्रूसिंचनानं अधिकाधिक खोल सांठवत गेलीस. अन् कर्तव्यपरायणते-साठी कंबरेला पदर खोवून उभी राहिलीस ती शेवटच्या क्षणापर्यंत ! पण हा शेवटचा क्षण तुझ्यासारख्या गुलाबाच्या फुलाजवळ येण्यास धजलाच कसा? तुझं मुग्ध सौंदर्य कुस्करताना ते निर्घृण हात थरथरले कसे नाहीत? न्यायचंच होतं तर फुलासारखं अलगद नेता येत नव्हतं का? इतक्या आसुरी रीतीनं ? सर्वांगाची लाहीलाही करून? आगीत होरपळून? सुरूपतेच्या जागी भेसूरता निर्माण करून? तुझे कुरळे कुंतल भस्म झाले होते. डोळ्यांची नीरांजनं कुठंतरी आत दडली होती... मुखमंडलावरील लोभसतेच्या जागी भीषणता ठाण मांडून बसली होती. चित्रपटात अवास्तव किंवा अतिरंजित वाटणारं तसलं दृश्य वास्तव बनून समोर टाकलं होतं. भेडसावत होतं. पहाणाऱ्याच्या दृष्टीत तुझ्याकडे पाहाण्याचं सामर्थ्य नव्हतं. दृष्टि बाजूला वळत होती. दृश्य विदीर्ण होत होतं. मनाला चरका बसत होता. अश्रूंचा पूर लोटत होता. जगातील शिव, सुंदर या तीन्हींवरील विश्वास नाहीसा होत होता. पायाखालचा आधारच ढासळत होता. अगदी निराधार वाटत होतं.

ती तूंच होतीस का? की आणखी कुणी? छे. तू असणं शक्यच नाही. तूं म्हणजे चारुता, सुभगता, कमनीयता ! तुझा तो डौल, ती रेखलेली शिल्पाकृति... काही काहीच शिल्लक नव्हतं. सारं... सारं भस्मीभूत ! ती तूं नव्हतीसच मुळी ! कुठं तरी दूरदूर गेलीस. अनेक योजनं दूर! तुझं सौंदर्य हे एक स्वप्न होतं. तो गतकाल होता. तो काळहि किती भराभर मागेमागे जात आहे. खरंच तू कधी सुंदर होतीस का? कधी काळी ? मला तर आठवतच नाही. यापूर्वी तू कशी होतीस? किती दूर दडला तो क्षण ! अन् हा आजचा क्षण सरकता सरकत नाही. तुझ्यातलं जे जे भद्र ते त्यानं अभद्र करून टाकलं आहे. सत्य असत्य केलं आहे.. सुंदर असुंदर केलं आहे. पर्यायानं तुझ्यातलं तूपणच त्यानं हिरावलं आहे. तुझ्यातील स्वत्वावर त्यानं घाला घातला आहे. आता उरला आहे तो परकेपणा अगदी परलोकासारखा . . .

"कधी आलीस? येना बस माझ्याजवळ" मी चमकते. मला माझ्या विचारांची लाज वाटते. अरे ! हा आवाज, चिरपरिचित स्वर आला कुठून ? दग्ध शरीरातून? सर्व गात्रं दग्ध झाली, नसानसा भस्म झाल्या, अंगअंग आगीतून होरपळून निघालं तरी अक्षय ! जसाच्या तसाच ! हा दग्ध गळ्यातून निघणं तरी शक्य आहे का? पण तो कानावर येतो आहे तर अशक्य तरी कसा म्हणू? त्या स्वराची जात, उंची, गुण सर्व अक्षुण्ण ! तीच मृदुवाणी, लाघवी भाषा.

तूं स्मिताचा प्रयत्न करतेस. पण ते स्मित जास्त केविलवाणं बनून कवण निर्माण करतं. माझ्या डोळ्याच्या भरभरून आलेल्या कडांना मी मोठ्या कष्टानं बांध घालते. "घाबरण्यासारखं काही नाही" तू शांतपणे म्हणालीस.

हे मी तुला सांगायचं की तू मला ?

"आईला कळवलं आहे. आज रात्रीच्या विमानानं येणार आहे." मी दिलासा देण्यासाठी म्हणते.

"छे. छे तिला कशाला कळवलं, उगाच तिला धक्का बसेल."

स्वतःच्या अवस्थेची जाणीव आहे एकूण. अशा वेळीहि दुसऱ्याच्या मनस्थितीचा इतका विचार!

केवळ आवाजच नव्हे तर अंगभूत स्वभाव सारं जसंच्या तसं !

"लवकरच मी बरी होईन व तिच्या भेटीला जाईन" केवढी ही फसवणूक ! स्वतःची की दुसऱ्याची? काही क्षणांचीच तुझी सोबत होती. साऱ्यांना हे पूर्णपणे ठाऊक होतं. कदाचित् तुलाहि ठाऊक असेल. पण उभा जन्म दुसऱ्यासाठी घालवलास. दुसऱ्याला काय वाटेल हाच अहोरात्र विचार! त्या विचारात स्वतःचे विचार दडवून ठेवलेस. अंतःकरणात बसलेले गहरे घाव मूकपणे सोसत राहिलीस ! आजतर - या अग्निदिव्यानं तुझं शरीरहि छिन्नविच्छिन्न केलं आहे. अंतर्बाह्य पुरी जमीनदोस्त झालीस. तुझं अंग अंग होरपळालं तरी तुझा अंगस्वभाव लोपला नाही. अग्नि त्यास हात लावण्यासहि धजला नाही. तुझा शब्द, तुझा स्वर, तुझं व्यक्तित्व, त्या व्यक्तित्वातील रस, गंध काही काही लोपलं नाही. त्या उत्तुंग ज्वालांच्या समुद्रातून तू धावत होतीस. "मला वांचवा मला वांचवा" पाषाणालाहि पाझर फोडणारा तो टाहो, अंतःकरण भेदून टाकणारा तो आर्त स्वर ! तुझ्या रूपानं पेटतं अग्निकुंडच धावत होतं. सहस्रशीर्ष, सहस्राक्ष आपल्या सहस्र जिव्हांनी तुझा ग्रास घेत होता. सारा क्षणांचाच अघटित खेळ. भोवतालचे लोक, अद्यावत वैद्यकीय मदत......सारं सारं अर्थशून्य ठरलं. तुझी आणि अग्नीची ती झुंज. त्याला दूर लोटण्यासाठी तूं धावत होतीस, त्यामुळेच तो चेकाळून तुझ्या अंगाशी झोंबत होता. अखेर तुझी कमनीय काया त्याच्या भक्ष्यस्थानी पडली. पण अक्षय राहिला तो तुझा शब्द ! अग्नीच्या त्या अघोर कृत्याला त्याला खेळ ठरवून उरला तो तुझा स्वर, तुझा स्वभाव. त्याला तो हात लावू शकला नाही. त्याच्यासमोर त्यानंहि हात टेकले. तुझा आर्जवीपणा, तुझा लाघवीपणा, तुझा कनवाळूपणा त्या अग्निदिव्यातूनहि अभंग राहीला. नव्हे जास्तच सतेज कांतिमान भासला. तुझी ती वाणी अक्षरशः "अशरीरी"वाणी ठरली त्यात मला खरी तू गवसलीस. तुझं खरं दर्शन घडलं!

वेळोवेळी तुझी ती वाणी मला साद घालते. आसमंतात भरलेला तुझा नाद मला ऐकू येतो. तुझ्या तो मंजुस्वन मला भारून टाकतो. मग आज तू नाहीस हे मी कसं म्हणू?

● ● ●





# पूनम का चाँद

हे यांत्रिकयुग आहे! अश्वयुग केव्हाच संपले आहे हे खरे, पण आधुनिक यंत्रांची ताकद सुद्धा अश्वशक्तीनेच मोजली जाते. सर्व जगात अश्वशक्ती हेच यंत्रशक्तीचे प्रमाण आहे आणि ह्यातच अश्वशक्तीची महती आहे!

मोठमोठ्या शूरवीरांच्या शौर्य-धैर्याच्या चमत्कारात घोडा हाच त्यांचा साथीदार होता! त्याच्याच बळावर व हिंमतीवर वीरांनी लढाया जिंकल्या, राज्ये जिंकली आणि शत्रूंचे पराभव केले.

शिकंदर बादशहाचा "बॉसीफरस," शिवाजी महाराजांची "कृष्णा" आणि महादजी शिंद्यांची "बिजली" हे घोडे आपली नांवे इतिहासात अजरामर करून गेले आहेत.

१९४४ च्या जुलै महिन्याच्या सुरवातीस एक घोडा माझ्या हाती लागला. बेलासीस रोडवरील उमर जमाल तबेल्यात हा घोडा एक दिवस संध्याकाळी मला अबदुल्ला दलालाने दाखवला. पुऱ्या मापाचा तो खंदा तरुण पंजाबी घोडा होता. त्याचा खांदा माझ्या डोक्याला लागत होता. म्हणजे तो पुरा सोळा हात म्हणजे चौसष्ट इंच उंच होता. रंगाने काळा व "पुरा पंचकल्याणी" होता. त्याचे कपाळ, तोंड व चारी पाय गुडघ्यापर्यंत पांढरे होते. दोन्ही डोळे घारे होते. म्हणून तो 'जयमंगल होता'. कपाळावरच्या भोवऱ्याला तुरा फुटलेला होता. अशा भोवऱ्याला "तुरे भोवरा" उर्फ "तुळशी वृंदावन भोवरा" म्हणतात. गळ्यात "कमलकंठा" व छातीवर लांबलचक "देवमणी" होता. एका देवमणीमुळे घोड्याची सर्व अशुभ लक्षणे रदबादल समजली जातात, इतके देवमणीचे महत्व आहे. पाय पांढरे असल्यामुळे खुरीही पांढऱ्या होत्या; पण त्यात दोन दोन काळे पट्टे होते. अशा खुरींना 'पद्मखूर' म्हणतात.

संपूर्ण सुलक्षणी असा हा घोडा अत्यंत निकृष्टावस्थेत होता. तो लाथा मारण्यास शिकला होता. गाडीवर लाथा मारून त्याच्या मागच्या दोन्ही पायाना जखमा होऊन त्यात किडे पडले होते. घोड्याचा मालक घोडा बाहेर काढून दाखवण्यासही कबूल नव्हता. "मैलाचार हो गया है साब! घोडा किसीको नजीक

**बाबुराव कामत**

भी आने को देता नही!" तो अगदी रडकुंडीला आला होता.

घोडा या गाझीमर्द प्राण्यावर माझा विश्वास आहे! असला सर्वांगसुंदर घोडा, इतका बदमाष असेल हे मला पटेना!

नाजुक जागी चाबकाचा फटका लागला किंवा चाबकाचे जास्त फटके ढुंगणावर बसले की घोडा लाथ मारतो. घोड्याची लाथ हे फार प्रभावी हत्यार आहे. आपल्याकडील ईश्वरदत्त हत्याराची त्याला एकवेळ जाणीव झाली की लाथा मारून तो आपला निषेध व्यक्त करू लागतो, व मग माणूस घाबरू लागतो. आपल्यावर हुकमत चालणारा माणूसप्राणी आपल्याला घाबरत आहे हे कळले की घोडा शिरजोर होतो व माणूस नरम होतो. मग त्याला जास्त घाबरण्यासाठी घोडा येता जाता जास्त लाथा मारू लागतो असे त्रांगडे आहे!

त्या घोड्याला अत्यंत वाईट वागणूक मिळालेली होती हे उघड होते. मनुष्य जातीवरचा त्याचा विश्वासच साफ उडालेला होता. माणसाबद्दल घोड्याला प्रेम वाटले पाहिजे. माणूस त्याला मित्र वाटला पाहिजे. पण या घोड्याला माणूस दुष्मन वाटत होता.

घोड्याच्या मालकाने शंभर रुपये किंमत मागितली. जास्त मागण्याची त्याला







हिंमत होईना. मी रुपयाचे आठ आणे दाखवले व शेवटी अवघ्या ६५ रुपयाना उभ्या जागीच घोडा खरेदी केला.

दुसऱ्या दिवशी सकाळी दोन हिंमतवाज माणसे व हाती धारदार चाकू घेऊन आम्ही घोडा आणण्यास गेलो. चाकूने घोड्याच्या आघाडी-पिछाडीचे बंद कापून घोडा ठाणावरून खुला केला.

घोडा कैक दिवस ठाणबंदच होता. खरारा न केल्यामुळे त्याच्या आयाळीत व शेपटीत खरुज होऊन ती चिघळली होती. त्यामुळे व पायांच्या जखमेतील किड्यां-मुळे घोडा अत्यंत गांजला होता व वेडा-पिसा झाला होता.

घोडा बाहेर येताच झटपट आम्ही त्याच्या तोंडात 'टाळुबीट' अडकावले. मागच्या मागे त्याने दोन लाथा उडवल्या, पण कोणावरही तोंड मात्र टाकले नाही. उमर जमाल तबेल्याच्या दारावरच्या मोठ्या दगडी कमानीजवळ घोडा उभा राहिला आणि आयाळीतली व शेपटीतली खरुज त्याने मनसोक्त खराखरा खाजवली अगदी रक्त निघेपर्यंत खाजवली. खरजेची कंडु शमताच तो थंड पडला व तोंडाने फुर-फुर करून शांत उभा राहिला.

माझा तर्क अगदी बरोबर होता. घोडा मूळचा शहाणा व समंजसच होता! चाळीस मैल वाट चालून दुसऱ्या दिवशी दुपारी घोडा वज्रेश्वरीस पोहोचला. तिथे गरम पाण्याची कुंडे नदीत जागोजाग आहेत. त्या गंधकयुक्त गरम पाण्याने घोड्याची खरुज धुतली गेली. त्या गरम पाण्याने जखमातील किडे मरून गेले व चारी पायाना सुरेख शेक मिळाला.

घोड्याचा मनुष्य जातीवरचा उपजत विश्वास थोडा परत आला!

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी घोडा घरी आला, तो सज्जन घोडा म्हणूनच. त्याने कोणावर तोंड टाकले नाही; कोणावर लाथ उडवली नाही.

मी त्याचे नांव ठेवले "पूनमका चांद"!!

त्याच्या जखमा व खरुज मी माझ्या हाताने पोटॅशच्या पाण्याने व हायड्रोजन पॅराक्साॅइडने धुतल्या व 'झटपट रुझ' मलम लावले. पुरा एक दिवस त्याच्याशी ओळख वाढवून मैत्री केली व दुसऱ्या दिवशी जीन बांधून वर बसलो. एक पाऊलही तो पुढे टाकीना, पण मला फेकून देण्याचा यत्न मात्र त्याने केला नाही. गोडगोड बोलून मी त्याला चालता केला व फक्त अर्धा मैल नेऊन मागे फिरवला.

त्याचा विश्वास संपादन करणे हे मुख्य व महत्वाचे होते!

दोनच दिवसात दोन अडीच मैल राजीखुषीने चालून तो बाजारपेठेत आला, तेव्हा त्याची हीनदीन अवस्था पाहून त्याला व मला लोक खदखदा हंसले!

चांद मला मानू लागला हे खरे पण त्याच्या मनात दडलेली भीति व त्यामुळे उत्पन्न झालेली अढी पूर्णपणे जाईना. मध्येच त्याला उकळी येई व मग तो अडून राही. दहा बारा दिवस मी यत्न करून पाहिले. माझे अश्वज्ञान तोकडे पडत होते. माझ्याहून जास्त तज्ञ माण-साची गरज होती. मी मौजुद्दीन हमजावक्ष याला कार्ड पाठवले.

> **चांद मला मानू लागला हे खरे. पण त्याच्या मनात दडलेली भीति व त्यामुळे उत्पन्न झालेली अढी पूर्णपणे जाईना. मधेच त्याला अढवणुकीची लहर येई....मग तो माझे काहीएक ऐकत नसे.....ऐकू लागल्यानंतर घडले ते अकस्मात् व अघटितच ...**

मौजुद्दीन राजस्थानातील अलवार संस्थानचा रहिवासी होता. रजपूत मुसलमान म्हणवून घेण्यात त्याला अभि-मान वाटे. तो सीधा शिपाई गडी होता. लुच्चेलफंगेगिरी त्याच्या रक्तात नव्हती. सरकारी रिसाल्यात पुरी चौदा वर्षे त्याने चाबुक स्वारी केली होती. त्याची करा-मत मी पाहिलेली होती. नोव्हेंबर १९४१-पासून मी त्याला ओळखत होतो. घोड्याच्या लगामीवर त्याची विलक्षण हुकमत होती. अश्वक्षेत्रातला तो खरा कलावंत होता. त्याच्या पांच बोटात जादु होती! पंजाबी गुरुचा तो शिष्य होता. चांद पंजाबी होता. शेकडो पंजाबी घोडे हाताळलेला मौजुद्दीन चांदला योग्य शिक्षक होता!

दुपारी मौजुद्दीन येऊन पोहोचला. घोड्याला पाहून तो खुष झाला. रिम-झिम पाऊस पडतच होता. तरीही मौजु-द्दीनने घोड्यावर जीन कसले व घोडा बाहेर काढला. त्याला फक्त तीनच दिवसाची रजा मिळाली होती. पाऊस वाढू लागला म्हणून अर्ध्या तासातच तो परतला. "घोडा बहोत शरीफ और अकलमंद है, साब! इसको तो मैं दो दीन में सुधार दुंगा"! मौजुद्दीनने मला तत्काल आश्वासन दिले, आणि माझा जीव खाली पडला. माझा विश्वास व्यर्थ नव्हता.

दुसऱ्या दिवशी सकाळीच चांद व मौजुद्दीन बाहेर पडले. पाऊस बिलकुल नव्हता. ते कुठे कुठे भटकले कोण जाणे. दहा वाजता ते परत आले. "घोडा पूरा सुधर गया, साब!" मौजुद्दीन पूर्ण विश्वा-साने म्हणाला.

मी स्वतःच्या डोळ्यानी पहात होतो. मौजुद्दीनच्या अंगाला चांद नाक घाशीत होता व मौजुद्दीन प्रेमाने त्याला मानेवर थोपटीत होता. मधले सर्व कांही चांद विसरला. एका मानव प्राण्याने घोड्याचा पूर्ण विश्वास व प्रेम संपादन करण्यात यश मिळवले होते. चांदचा पुनर्जन्म झाला होता.

दुसऱ्या दिवशी मौजुद्दीनने जीन बांधून घोडा बाहेर काढला व तो मला म्हणाला "अभी आप बैठ जाव, साब!" मी घोड्या-वर चढलो. पाठीवर बसलेला माणूस







आपला गुरु मौजुद्दीन नाही हे चांदला जाणवले, आणि मागच्या दोन पायांवर तो ताठ उभा राहिला. समोर उभ्या असलेल्या मौजुद्दीनकडे मी रोखून पाहिले. तो शरमिंदा झाला. त्याच्या अश्वविद्येला चांदने बट्टा लावला होता—नकळत!

"जरा उतर जाना, साव!" हळू अजीजीच्या आवाजाने मौजुद्दीन बोलला. आणि न बोलता मी चटकन् खाली उतरलो.

मौजुद्दीन घोड्यावर चढला. त्याच्या हातात त्याचा पांच वाद्या असलेला यशस्वी चाबुक होता. त्याची ती भवानी तलवार होती. तो चाबुक त्याच्या कायम हातात असे. त्या चाबकाचा त्याला अभिमान होता. डाव्या हातात लगामी धरून चाबकाचा उजवा हात वर करून तो मला म्हणाला "दो दिन मे एकभी वक्त मैंने घोडेको चाबुक नही लगाया! अभी लगा रहा हूं!" नंतर तो करड्या आवाजात घोड्याला म्हणाला, "मैंने तेरी इतनी तारीफ किया, और तुने मेरी इज्जत मट्टीमे मिला दिया! कैसी खानदान है तेरी?" हे शब्द संपवून हातातल्या चाबकाचा एकच फटका त्याने चांदच्या पुठ्ठ्यावर ओढला.

चाबुक कुठे, कधी व कसा मारावा ह्याचे ज्ञान असलेल्या माणसालाच 'चाबुकस्वार' म्हणतात! चाबुकस्वार म्हणजे सपासप चाबुक मारणारा गाडीवाला किंवा टांगेवाला नव्हे!

चाबुक लगावून लगामीच्या करामतीवर मौजुद्दीनने घोडा जागच्या जागी उडवला व दोन चकरा मारून खात्री करून घेतली. त्याने घोडा उभा केला व तो खाली उतरला व मला म्हणाला "अभी बैठ जाव, साव !"

मी घोड्यावर चढलो. मौजुद्दीनला विचारले "अभी घोडा अढी नही करेगा?" "अभी की क्या बात साब? घोडा कभी अढी नही करेगा!"

केवढा स्वत:च्या चाबुकस्वारीवर विश्वास आणि केवढा घोड्यावर विश्वास !

त्याच दिवशी निरोप घेऊन मौजुद्दीन निघून गेला. त्याचा विश्वास चांदने शंभर टक्के खरा करून दाखवला. त्यानंतर कधीही त्याने अढी केली नाही.

चांदची कीर्ती आजुबाजूस पसरली होती. चांदसारखे घोडे त्या लढाईच्या व पेट्रोल टंचाईच्या दिवसात दुर्मिळ होते. ठिकठिकाणच्या रिमाऊंट डेपोमध्ये रिसाल्यासाठी घोडे जमा केले जात होते.

सप्टेंबरच्या दुसऱ्या आठवड्याच्या रविवारी भिलाड—संजाण येथील माझा एक जुना मित्र श्री. जाफर अबदुल हक्क (आता कै.) एका तरुण जंगल कंत्राटदाराला घेऊन माझ्या घरी आला. तो तरुण चांगलाच उंचापूरा व वजनदार होता. मी घरी नव्हतो. माझ्या माणसांनी त्याला घोड्यावर जीन बांधून दिले. त्याच्या भारी वजनाखाली चांद जराही वाकला नाही. तो तरुण खूष झाला. जाफरला तो म्हणाला "जाफरभाई! गमे ते करीने मारा माटे एटलो घोडो लेवो." तो नगरहवेलीच्या सिलवासचा होता. गुजराथी मुसलमान आपसातही गुजरातीच

बोलतात. जाफरने माझ्या पत्नीसमोर ७५० रुपये ठेवले व घोडा देण्याचा तिला पुष्कळ आग्रह केला. पण माझ्या गैरहजेरीत घोडा विकण्याची जोखम घेण्यास ती तयार नव्हती. चांदवरील माझी माया ती पूर्णपणे जाणून होती. जाफरचा नाईलाज झाला. मंगळवारी पुन्हा येतो असा निरोप ठेवून जाफर व तो तरुण निराशेने परत गेले.

पण ईश्वरेच्छा निराळीच होती. आम्हाला त्याची कल्पना नव्हती.

दुसऱ्या दिवशी, सकाळी चांद तळ्यात बुडाला! तोही चार फूट पाण्यात!

चांद तेव्हा पाण्यात नुकताच शिरला होता. त्याचे चारी पाय जमिनीवर होते. पाण्यातून तो चालत होता. पाणी जेमतेम त्याच्या पोटास लागले असेल नसेल. पण उन्हाळ्याच्या दिवसात सुक्या तळ्यातून कोणीतरी चिखलमाती काढून नेताना वाटोळा मोठा खड्डा मारला होता. त्या खड्ड्यात नेमके त्याचे पुढचे पाय पडले असावेत. तो ठोकरला व डोक्यावर उलटा झाला. पुढचे पाय खड्ड्यात व मागचे जमिनीवर असल्यामुळे त्याला उठता आले नाही व त्याचे कान, नाक मात्र सर्व पाण्यात बुडाले व तो गुदमरला.

पाच सात मिनिटात आम्ही त्याला बाहेर काढला. त्याच्या पोटात पाण्याचा एक थेंबही गेला नव्हता; पण गुदमरल्यामुळे त्याचे प्राण गेले होते!

चांदच्या या आकस्मिक अपघाती मृत्युमुळे आम्ही खचलो!

चांदला आम्ही सन्मानपूर्वक मूठमाती दिली.

चांदच्या अपघाती मृत्यूची वातमी मौजुद्दीनला कळवताच तो धावत भेटीस आला. जणू काय घरातल्या कोणा माणसाचाच मृत्यु झाला होता. दोघानी एकमेकांस पहाताच आम्हा दोघाना रडू कोसळले. "ऐसा शरीफ और अकलमंद घोडा नही मिलेगा, साब!" हेच पालुपद घोळून मौजुद्दीन पुन्हा पुन्हा हळहळत होता...... ●●●

(पृष्ठ ३५ वरून . . . नितम्बवतीची)

डाकीण आली. जळके प्रेत ओढू लागली. मी कामचुकार नाही. म्हणून मी धावून गेलो. डाकिणीला मी धरली. आमची झटापट झाली. त्यात माझ्या हातातील सुरी तिच्या जघनाला लागली. तेव्हा तिने हिसका मारला. आणि ती निसटली. तेव्हा हे नुपूर हातात आले. ही खरी गोष्ट आहे. आता तारा किंवा मारा.

"मग पौरानी परीक्षा घेतली. नितम्बवतीच्या मांडीवर जखम निघाली. ती डाकिणी हे सिद्ध झाले. पतीने तिला टाकले. पौरानी तिला दंडिले. गांवाबाहेर काढले. स्मशानात नेऊन सोडले. ती जीवाला विटली. जीव देण्यास सिद्ध झाली. तोच कलहकंटक पुढे आला. म्हणाला, 'सुंदरी, हे काय? ऐक जरा. मी तुझे रूप पाहिले. त्याने मला वेड लागले. मी श्रमणिकेला गाठले. तुझ्यासाठी प्रयत्न केले. ते सारे व्यर्थ गेले. म्हणून हा उपाय केला. आता तुला मार्ग नाही. आता तू माझी आहेस. तू मला हवीस. जन्मभर हवीस. मी तुला सुख देईन. असाधारण सुख देईन. कुणी न दिले ते सुख देईन. मी तुझा दास आहे. प्रसन्न हो. प्रसन्न हो'. म्हणून तिच्या पायी पडला. पुन्हा उठला. पुन्हा प्रार्थना केली. पुन्हा शरण आला. पुन्हा प्रार्थना केली. असे शतवार झाले. तिला तरी दुसरा मार्ग काय होता? त्यामुळे शेवटी ती त्याची झाली."

अशी कहाणी मी सांगितली. तेव्हा राक्षस म्हणाला,

"आणि मग काय झाले?"

"हात वेड्या! ते मला माहित नाही."

"अरे चोरा, अशी भानगड आहे काय? मी तुला असा सोडणार नाही. मी दुसरा प्रश्न विचारणार."

"विचार." ●●●















दीपावलीकडे अभिप्रायार्थ पुस्तके पाठविताना नेहमी २ प्रति पाठवाव्यात. म्हणजे निश्चित अभिप्राय देणे सोईचे होते. १ प्रत असल्यास नुसती पोच दिली जाते.

—संपादक

सारे प्रवासी घडीचे ● आत्रेय कथा

## खरच कोंकण असे आहे का ?

**कोंकण**-विभाग हा मोठा विलक्षण. सतत दारिद्र्यात पिचणाऱ्या पण महाबुद्धिमान माणसाना त्याने जन्म दिला. ती माणसे काहीशी आळशी, पण खवीस, तिरकस दृष्टिकोण असणारी. त्यांचे गुणहि मोठे आणि दोषहि मोठे ! पु. लं. च्या 'अन्तु बर्व्या'च्या लेखी 'स्वराज्याचा संबंध टिळकांशीहि नाही. गांधींशीहि नाही आणि सावरकरांशीहि नाही. धंदा बुडित खाती जायला लागला म्हणून ( इंग्रजाने ) फुकलेनीत दिवाळे !' अत्यंत विस्मयकारक आहे ह्या माणसांची जडण अन् घडण !

'**चक्र**' लिहून पारितोषिकाचे मानकरी झालेल्या जयवन्त दळवींच्या रसाळ शैलीतून कोंकणातील अशीच अनेक माणसे साकारलेली दिसतात, त्यांच्या '**सारे प्रवासी घडीचे**'मध्ये. 'सर्रास दुष्काळी दारिद्र्य. मूळची अभिमानी माणसे गरिबीत पिचत पडलेली ! त्यामुळे स्वभावात एक प्रकारचा कडवटपणा खोलवर मुरलेला. मन नित्याचे असमाधानी आणि चरफडणारे ! मूळचे डोके कुशाग्र. पण ते कुठे गुंतवायला साधन नाही. त्यामुळे दुसऱ्याच्या गोष्टीत, विशेषतः भानगडीत लक्ष घालणे, त्याच गोष्टींचा रवंथ करणे हे एरवी फुकट जाणारा वेळ घालविण्याचे एकमेव साधन !' अशा ह्या परिस्थितीमुळे कोर्ट–कचेऱ्यांपेक्षा वेगळे राजकारण उरलेच नाही. 'मार्क्सवादी, कॉंग्रेसवादी असे अनेक प्रकारचे वादी इथे वेळोवेळी आले आणि गेले. पण कुठलेहि वादी येथे रुजले नाहीत. फक्त वादी आणि प्रतिवादी हे दोनच वादी तेवढे मूळ धरून राहिले.' पण 'वागण्यात थोडेसे तिरसट असले तरी या लोकांसारखे सनदशीर लोक दुसरीकडे कुठे सापडायचे नाहीत....संताप व्यक्त करण्याचा एकमेव मार्ग म्हणजे आई–बहिणीचा उद्धार करणाऱ्या शिव्या द्यायच्या. देण्यासारखे त्यांच्यापाशी एव्हढेच !' दारिद्र्यच इतके भीषण की, गांधीवधासारख्या प्रसंगी देखील ब्राह्मणांची लुटालूट झाली नाही. कारण, 'नाही तरी लुटायचे काय? लंगोटीवाल्याने पंच्याला हात घालायचा?'

### भेटलेल्या व्यक्तींचे दर्शन

अशा ह्या कोंकणातील दळवींचे एक गाव. जिथे ते लहानाचे मोठे झाले. मुंबईत स्थाइक झाल्यावर एक दिवस ते ह्या गावी आले. मोडकळीस आलेल्या, जळमटांच्या रूपाने शिल्लक राहिलेल्या जमीनदारी वैभवसंपन्न अशा आपल्या वाड्यात शिरले ! बदलत्या परिस्थितीचा आवाका येताच मन गलबलले. अन्तर्मुख बनले. चिंतन केले. ह्या चिंतनातच लहानपणी ह्या गावात पाहिलेल्या एकेक व्यक्ति त्यांच्या डोळ्यासमोर साकारू लागल्या.

### कोंकणी जीवनाचे नाट्य–दर्शन

झाडाच्या सावलीत बसून मटणभाकऱ्या खायला घालणारा झिलू केदार दिसू लागला. शाळेत दाखल करण्याची तिथी देखील पंचांग पाहून सांगणारे विनायक भटजी समोर आले. 'मेल्या डुकरासारखो लोळतंय् कित्याक्' म्हणून पाठीत धपाटा घालून बळजबरीने शाळेत पाठविणारी आई दिसली. चोरून विड्या ओढणाऱ्या पण प्रेमळ आजीचा आसरा गवसला. शुद्धलेखन व 'भो पंचम जॉर्ज भूप धन्य' ह्या एकाच गीताबद्दल जागरूक असलेले पण निरुपद्रवी बागाईतकर हेडमास्तर आठवले. खादीचा पोशाख घालून (उगीचच ) काहीतरी करण्याची इच्छा बाळगणारे अमृते मास्तर दिसले. वर्गात वेताळासारखा हिंडणारा पण रात्री शेण खाणारा बागाईतकरांनंरचा 'पावटचा' आठवला. मेंबराच्या पोशाखात शेरेबुकावर आंगठा उठविणारा केशा चांभार, गुणी परंतु उपेक्षित नरू, सम र्थांच्या उक्ति घोळवीत अहोरात्र छिद्रे हुडकत राहणारा वामन दाजी, उत्कृष्ट बातमीदार शांत्या न्हावी, स्वतःस समाजसुधारक समजणारे पण लोकांनी ज्यांचा मामा केलाय असे डॉ. रामदास, लग्नाच्या बायकोकडून हक्काने पैसे उकळून भाविणीकडे झिंगून पडणारा पिढीजात दशावतारी राक्षसासारखा रानगट जिवा, उदयास येऊ पाहणारा 'कलावंत' दादू गुरव, झाडाझुडुपाना देखील मानवी भावना आहेत असे म्हणणारा 'हापम्याड' तात्या रेडकर, 'नाय नाय भाऊ', स्वतःची दाढीमिशी जवळ बाळगणारा नट-भावड्या किलींडर, गंगू भावीण, संशोधक पण लोकांच्या कुचेष्टेचा विषय बनलेले केसूकाका नाडकर्णी, मार्क्सवादी दिनक्या, गिऱ्हाईकांची गॅरंटी शोधणारा गुंडू खाटीक, परीटघडीच्या अंगरख्यावर तुळशीपत्रे व पाणी ओतून वापरणारा किर्तनकार नागबा जोशी, भाविणीशी संसार थाटणारा प्रेमवेडा व्यंकटेश्वर भट, दारूचा गुत्ता चालविणारा स्थितप्रज्ञ पेस्तॉंव, वॉचमेकर बाळ्या; अशी







किती एक माणसे डोळ्यांसमोर चलत्-चित्रपटांतील दृश्यांप्रमाणे दिसून जातात करडे परंतु प्रेमळ व रवळनाथाच्या श्रद्धेच्या गोष्टी घोळवून सांगणारे 'टिपिकल' जमीनदार आबा-वडिल याची देखील आठवण डोळयांसमोरून लकाकून जाते. कितीतरी माणसे ! 'जगावेगळी जगली. जगावेगळी मेली ! भरडचा जमिनीत जन्मली आणि मुरमासारखी खडबडीत राहिली.'

ह्या सर्व व्यक्तिरेखा जिवंत आहेत. ओघवती शैलीतून आलेली मार्मिक वाक्ये त्याचा आकार घडवितात. 'स्वतः अनवाणी हिंडून दुसऱ्यांना पायतणे शिवून देण्यात त्याची हयात गेली' ह्या वाक्यातून केशा चांभार आकारतो. 'आटलेला अभ्रा लोडावर ओढावा तशी बाराबंदी' अंगावर दिसणारे आपटे शास्त्री समोर उभे असलेले दिसतात. 'सप्तपदी करणाऱ्या नवरदेवासारखे पाय उचलणारे' बैलहि कितपत शेती करणार ते ताबडतोब लक्षात येते. अशा मार्मिक वर्णनाबरोबरच प्रादेशिक बोलीचा समुचित उपयोग त्या पात्रात चैतन्य ओतण्यास कारणीभूत होतो. असे वाटते की, आपणहि ही सर्व माणसे समोर पहात आहोत.

**सलगतेतही विलगता**

पण ह्या व्यक्तींची संपूर्ण जीवने आपल्या समोर येत नाहीत. समोर आहेत त्या काही झलकी. लेखकाने पूर्वी पाहिलेली ही माणसे. त्यांच्या ह्या स्मृति. त्यांचा लेखकाच्या जीवनावर, ते घडविण्यावर काही परिणाम झाला आहे अशातला भाग नाही. ही सर्व पात्रे एकमेकांशी संबंधित आहेत, असेहि नाही. त्यामुळे एक सलगता, श्रृंखलाबद्धता त्यात नाही. लेखक स्वतः 'अशी एकेक माणसे' असे म्हणून स्वतःच गतीत खंड पाडतो. क्वचित ठिकाणी ही साखळी आहे हे खरे! तसेच लहानपणी शाळेतील काही प्रसंगांपुरते कथानक पुढे जाते हे खरे! पण नंतर ते थांबते ते कायमचेच. तसे पाहिले तर ह्या चित्रणात सलग कथानक नाहीच. तशातच पुनरुक्ति, वारंवार सिंहावलोकन करण्याची ऊर्मि ह्या दोषांमुळेहि कथनाच्या गतीत खंड पडतो. त्यामुळे कादम्बरीसारखे सलग, ओघपूर्ण कथानक, पात्रांच्या जीवनाची गुंफण, त्या सर्वांतून साधलेला एक नियोजित परिणाम ह्या गोष्टी इथे सांपडत नाहीत असे म्हणावेसे वाटते. आमच्या समोर उभ्या आहेत त्या कोंकणातील काही व्यक्ति. आणि त्यांच्या जीवनचित्राचा परिणाम. म्हणून आमच्या मनावर बिंबते ते कोंकणचे विलक्षण व विचित्र जीवन ! त्यातली खोंच, त्यातली करुणार्द्रता आणि त्यातली विलक्षणता ! पुस्तकाच्या नांवावरून तरी हाच परिणाम लेखकास अपेक्षित होता असे वाटत नाही.

'लेखकाच्या जुन्या वाडयात अपशकुन करण्यासाठी का होईना, एखादी पाल चुकचुकली' अशी भावना मनात वेदना जरी निर्माण करीत असली, लहानपणी घेतलेल्या बासरीतून सूर निघणार नाहीत ही जाणीवहि हृदय हलविणारी असली, तरी 'भोवतालच्या माणसात आपुलकीने मिसळून, स्थिर राहून नाती, निष्ठा, ओढ यांचे धागे जुळवून धन्यतेचे, साफल्याचे जाळे विणण्याचे दिवस आता संपले. आता एकाकी यात्रा !' ही जाणीव एकांतिक वाटते. युद्धाच्या खाईत देखील माणसांची मने पालवतात, केव्हाही आणि कोठेहि; हा धर्म आहे, आणि माणूस जिवंत आहे तोपर्यंत तो टिकणार आहे. या दृष्टिकोणाचा लेखकाचा व्यक्तिगत दृष्टिकोण म्हणून विचार केला तरी जी पात्रे त्याने रंगविली त्यातून अपरिहार्यतेने व सहजतेने तो निर्माण होत नाही; ही वस्तुस्थिति आहे. कारण, अनेक उल्लिखित व्यक्तिरेखांशी लेखकाचे जिव्हाळयाचे नाते गुंफलेले होते, असे नसून, ती त्याने केवळ पाहिलेली, अनुभवलेली पात्रे आहेत इतकेच. आणि म्हणूनच ह्या पुस्तकास 'कादंबरी' ही संज्ञा देता येणार नाही. ही व्यक्तिचित्रेच ! कोकणच्या जीवनाचा पडसाद उमटविणारी! म्हणून यांचे स्वरुप 'बटाटयाच्या चाळी'सारखे !

हा वाद आपण सोडून देऊ शकतो. कारण, जी व्यक्तिचित्रे समोर आहेत. ती प्रत्ययकारी आहेत. त्या पात्रांच्या आधाराने आलेले अनेक प्रसंगहि रसपूर्ण आहेत. काही विनोदाचे, काही कारुण्याचे ! सरस्वती पूजनाचा शाळेत झालेला शिमगा, पावटे मास्तरांविरुद्धचे व पर्यायाने पिढीजात वैर असलेल्या बावुल्याविरुद्धचे आबांचे राजकारण, नरूचा 'नेरू' (नेहरू) समजून पोर्तुगीजांकडून मार खाणे, बाबुलीच्या मुलीबरोबरचे प्रेमप्रकरण, रवळनाथ प्रासादिक दशावतारी मंडळीचा नाटयप्रयोग, दादुल्या गुरवाचे वस्त्रहरण हे सारे प्रसंग विलक्षण पकड घेतात. हंसवतात. विचार करायला लावतात. 'नेहरूंनी भेट म्हणून पाठविलेले आंबे इंग्लंडच्या राणीला आवडले हे वाचताच "फुकट गावले ते वायट कित्यांक?" एवढे अर्थशास्त्रीय सत्य' येथील गांवातील










अड्डयांवरून व्यक्त झालेले पाहून मन स्तिमित होते. परिस्थिति आणि बुद्धि यांच्या संकटातून घडलेल्या या मनोप्रवृत्ति पाहून आपण अधिकाधिक चिंतनशील बनतो हा नीट्स व रसाळ 'सारे प्रवासी घडीचे'चा परिणाम, हे नाकबूल करता येणार नाही.

—प्रा. विलास चाफेकर

[**सारे प्रवासी घडीचे**—लेखक **जयवंत दळवी.** प्रकाशक मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई ४ पृष्ठे १८३, मूल्य रु. ७.५०.]

## आचार्य अत्रे यांचे आगळे दर्शन

आचार्य अत्रे यांच्या अत्यंत निवडक विनोदी व करुण कथा '**आत्रेय कथा**' या संग्रहात समाविष्ट करण्यात आल्या आहेत. आज अत्रे हे प्रामुख्याने पत्रकार व नाटककार म्हणून वाचकांसमोर असले तरी त्यांनी वेळोवेळी कथा लिहिल्या असून त्या विलक्षण प्रभावी ठरल्या आहेत. उत्कृष्ट विनोदकार हा उत्कृष्ट कारुण्यनिर्माताही असावा लागतो. किंबहुना प्रत्येक हास्याला एक छोटीशी कारुण्याची किनार लागलेली असते किंवा प्रत्येक कारुण्यामागे कोठेतरी हास्य उभे असते असे नेहमीच अनुभवाला येत असते. अति दुःखाचे शेवटी हसूच निर्माण होते. तीच गोष्ट विनोदाची. विलक्षण सहानुभूतीशिवाय काळीज कापणारे कारुण्य निर्मिता येत नाही किंवा मुरकुंडी वळवणारा विनोद निर्मिता येत नाही. आणि सहानुभूती अंगी असण्यासाठी मानवी जीवनाकडे पाहण्याची एक विशिष्ट दृष्टी असावी लागते. अत्रे यांच्या ठायी हे असल्यामुळेच त्यांच्या विनोदी व करुण कथा वाचकांना आजही चटका लावून जातात. रंगवून टाकतात.

### विनोद + कारुण्य = जीवन

अत्रे हे उत्कृष्ट गोष्टीवेल्हाळ असल्याने त्यांना दोन्ही रसांमध्ये वाचकांना आकंठ बुडविण्याचे सहज साधून जाते. ते कथा लिहित नाहीत, ते कथा सांगतात. त्यांच्या शैलीत हा गोष्टीवेल्हाळपणा पूर्ण सरमिसळून गेलेला आहे. त्यामुळे ते वर्णित असलेली व्यक्ति, प्रसंग एकदम डोळ्यांपुढे साकार होतात, जिवंत होऊन उभे राहतात.

त्यांच्या वेगवेगळ्या कथा-संग्रहातून निवडून काढलेल्या या कथा असल्याने वाचकांना त्यांचा पुरतेपणी परिचय असल्याने त्यांचे वेगळे 'समीक्षण' करण्याची खरोखरी गरज नाही.

गुत्यात नारद, ब्रँडीची बाटली, जांबुवंत दंतमंजन, बाजारात तुरी, सिंधूचा बाप, गांधीवादी पाहुणा यासारख्या विनोदी कथा आजही टवटवीत ठरतात. विशेषतः 'जांबुवंत'मधील बगाराम व 'ब्रँडीची बाटली'तील त्रिवकराव ही पात्रे वाचकांच्या अगदी ओळखीतील होऊन बसलेली आहेत. सासऱ्याच्या ट्रंकेतील इस्टेटीची अनोखी कहाणी सांगणारी 'बाजारात तुरी' हीही अशीच खुमासदार आहे. 'सिंधूचा बाप' ही कथा नाटक मंडळीशी ओळखदेख असणाऱ्या वाचकांना तर खरोखर हसता हसता पुरेवाट करीलच, पण स्वतः अत्रे म्हणतात त्याप्रमाणे कोणीही ती मोठ्याने वाचून पाहिली तरी त्याची हंसून हंसून मुरकुंडी वळल्यावांचून राहणार नाही इतकी गंमत व इतके नाट्य त्या गोष्टीत काठोकाठ भरून राहिले आहे. 'गांधीवादी पाहुणा' ही विनोदी कथा आजच्या परिस्थितीत करुणच अधिक अशी वाटते!!

त्यांच्या समुद्राची देणगी, महापुरात बुडालेला विष्णु बत्ताशी या गोष्टी हृदयाला खरोखरच पीळ पाडणाऱ्या आहेत. वर उल्लेखिलेल्या अत्यंत हास्यस्फोटक कथा लिहिणाऱ्या अत्र्यांनीच या तितक्याच हृदय हेलावणाऱ्या कथा तेवढ्याच विलक्षण प्रभावीपणाने लिहाव्यात याचे वाचकाला खरेच कौतुक व आश्चर्य वाटल्यावांचून राहणार नाही. या संग्रहातील दोन तीन कथा नामवंत परदेशी कथा-लेखकांच्या कथांवरून घेतलेल्या असल्यातरी त्यांचा सांचा इतका बेमालूम जुळला आहे की, त्यांचे मूळ परकी आहे हे समजूच शकत नाही.

मात्र सदोबांचे राज्य, मुरारजींची दिवाळी, व गौतम बुद्धांचे मुंबईत आगमन या तीन राजकीय गोष्टी इतर कथांच्या मानाने डाव्या ठरतात. त्या राजकीय कथा आहेत, म्हणून त्यांचे महत्व कितीही असले तरी त्या अत्र्यांमधील कथाकाराचे अस्सल गुणांचा स्पर्श घेऊन अवतरलेल्या नाहीत. त्यात राजकीय वसा घेतलेला पत्रकारच अधिक डोकावतो! कथेच्या ऐतिहासिक आढाव्यात राजकीय कथांचा एक नमुना म्हणून त्या निर्देशिता येतीलही. मात्र प्रासंगिक अशा उत्कृष्ट कथा म्हणूनच त्यांचा अधिक उल्लेख करणे इष्ट ठरेल.

आचार्य अत्रे यांच्या भाषाशैली व निवेदनपद्धतीबद्दलही वेगळे लिहिण्याची गरज नाही. अंगीकृत विषयाशी तादात्म होऊन ती शैली व निवेदन पद्धती त्या विषयाला एकदम वेगळे सामर्थ्य आणते असे आपणास दिसून येते. विषयाची निवड कशी झाली याचे निवेदन स्वतः अत्रे यांनी प्रस्तावनेत केले असल्याने विषय सुचल्यावर त्याची खुलावट व सजावट कशी करावी याचा एक वस्तुपाठच नवोदित लेखकांना या कथांतून अनायासे मिळून जातो, हे मुद्दाम नमूद करावयास हवे.

त्याच प्रमाणे अत्रे यांच्या कथा वाचताना आज लिहिल्या जात असलेल्या विनोदी कथांचा विचार आल्यावांचून रहात नाही. तसेच आजची कथा अजूनही कोणत्या आवर्तात फिरत आहे हेही कळून येते. विषय निवडीच्या काय किंवा त्याच्या निवेदनाच्या संबंधात काय आजच्या विनोदी कथेने फारशी मजल मारलेली दिसत नाही हेच पटते. त्याही दृष्टीने 'आत्रेय कथां'चे महत्त्व आहे. प्रस्तुत संग्रहाने वाचकांना पुनः प्रत्ययाचा अनिर्वचनीय आनंद मिळतो ही एकच गोष्ट त्याची संग्राह्यता सिद्ध करते एवढे म्हटले तरी पुरे.

—पद्माकर कुळकर्णी

[**आत्रेय कथा** (निवडक कथा) ले. प्रल्हाद केशव अत्रे. प्रका. ग. पां. परचुरे. मुंबई, ४. पृष्ठे २८८ मूल्य १० रुपये]



# इंद्रधनुष्य

—ज्ञानेश्वर नाडकर्णी

## गोऱ्या साहेबांचे नाटक !

**दोनशे** वर्षांपूर्वी आपल्या या मुंबई शहरात नाटकाचे वारे प्रथम आणले ते कंपनी सरकारच्या इंग्रज नोकरांनी ! यात जसे व्यापारानिमित्त मुंबई बेटावर स्थायिक झालेले गोरे साहेब होते तसेच इथल्या इंग्रज लष्करातले सोजीरही होते. या लोकांची नेहमीची करमणूक राहिली होती दूर विलायतेत घरी! तेव्हा त्यांनी या परदेशात स्वतःची करमणूक स्वतःच नाटके बसवून करून घेण्याचा निर्धार केला, अन् केले इंग्रजी नाटकांचे प्रयोग!

पुढेपुढे इथल्या सुशिक्षित पारशी मंडळींनी आपल्या या इंग्रजी बांधवांना साथ दिली, अन् इंग्रजी नाटकांचे खूपच प्रस्थ माजले. मुंबईत बांधल्या गेलेल्या पहिल्यावहिल्या थिएटरात मराठी नाटकांचे जनक कै. विष्णुदास भावे आपली मंडळी घेऊन यायच्या पूर्वीपासून हे साहेबी प्रयोग तिथे झडत होते.

साहेबांनी नाटक करायचे, अन् ते बघायचेसुद्धा साहेबांनी अन् त्यांच्या मडमांनी! ही प्रथा आजदेखील या मुंबापुरीत चालू आहे. ऑगस्टच्या अखेरीला ज्या ब्रिटिश वुमेन्स असोसिएशन (बिडब्ल्यूए) या संस्थेने 'द राइट ऑनरेबल जंटलमन' या नाटकाचा प्रयोग येथील तेजपाल नाट्यगृहात केले ती वर्षाकाठी अशी तीन चार नाटके करते, अन् ती बघायला सुटाबुटातले लोक जातात! (मात्र तुमच्याकडे सूट नसला तर ती पाहायला तुम्हाला बंदी आहे असे समजू नका—इथे तरी ब्रिटिश लोकांची सायंभोजनाच्या अगर पार्टीच्या वेळची शिस्त लागू पडत नाही ! )

अगदी परवा परवापर्यंत ही ब्रिटिश मंडळींची नाटके केवळ हौस म्हणून वाखाणण्यासारखी असत; परंतु अलीकडे डेरेक बॉन्ड व जॉन स्मिदर्ड या दोन दिग्दर्शकांनी या प्रयोगांचा दर्जा बराच सुधारलेला आहे. पूर्वी लोक बिडब्ल्यूएची नाटके पाहायला गर्दी करीत याचे कारण त्यांचे उत्पन्न धर्मादाय दिले जाते; पण आता मात्र आपल्याला एक चांगला प्रयोग पाहायला मिळणार अशी त्यांची खात्री असते.

'द राइट ऑनरेबल जंटलमन' हे नाटक लिहिणारा मायकेल ब्रॅडले—डाइन हा लेखक जरा देखील गाजलेला नाही. पण गेल्या शतकात पार्लमेंटातील लिबरल पक्षाचा एक प्रमुख सभासद असलेला सर चार्लस् डिल्क याच्या चरित्रातील काही खळबळजनक घटनांना बेमालूमपणे नाटचरूप देऊन त्याने निर्माण केलेली आहे मात्र एक चित्तवेधक, सुबक कलाकृती!

सर चार्लस् हा प्रागतिक दृष्टिकोणाचा, विशेषतः ब्रिटिश वसाहतींना कारभाराचे स्वातंत्र्य द्यावे अशा मताचा पुरस्कार करणारा एक लोकप्रिय खासदार असतो. त्याच्या घरोब्यातल्या एका घराण्यातील मिसेस क्रॉफर्ड नांवाची एक विवाहित बाई आपल्या नवऱ्यापासून घटस्फोट घेण्याच्या भानगडीत निष्कारण त्याचे नांव गोवते! आपले त्याच्याशी अनैतिक संबंध होते असे नवऱ्याला सांगते !

ज्यावेळी हे किटाळ सर चार्लस्च्या अंगावर येते तेव्हा तो आगामी निवडणुकीच्या प्रचारात गुंतलेला असतो. त्याचा धूर्त मित्र जोसेफ चेंबरलेन (हा लिबरल पक्षाचा आणखी एक नेता) त्याला नकळत अशी व्यवस्था करतो की क्रॉफर्ड दांपत्याच्या घटस्फोटाचा खटला कोर्टात पुरता उभा न राहताच त्या दोघांना घटस्फोट मिळेल !

अशा रीतीने कोर्टात सर चार्लस्ला आपले चारित्र्य शुद्ध आहे हे जनतेला पटवून देण्याची संधीच मिळत नाही. केवळ मिसेस क्रॉफर्डने आपली मूळ जबानी मागे घेतली म्हणून न्यायाधीश त्याला दोषमुक्त ठरवितो.

सर चार्लस्चे लग्न दरम्यान ज्या बाईशी होते ती मात्र या प्रकरणाचा पुरता छडा लावण्याचे ठरविते. शेवटी उघडकीस येते ते हे की मिसेस क्रॉफर्डचेच नव्हे तर तिच्या विवाहित धाकट्या बहिणीचे अनैतिक संबंध होते ते सैन्यातील एका अधिकाऱ्याशी ! घटस्फोट मिळताच मिसेस क्रॉफर्ड त्याच्याशी लग्न करणार असते; परंतु आपले बिंग चव्हाट्यावर येईल अशी धास्ती वाटून तो ऐन वेळेला कच खातो!

या प्रकरणात दुसरा एक चमत्कारिक मामला असतो, तो असा की सर चार्लस्ची पहिली बायको हयात असताना त्याचे व मिसेस क्रॉफर्डची आई मिसेस रॉझिटर यांचे गुप्त प्रेमसंबंध होते ! एका परीने मिसेस क्रॉफर्डला हे बोचत असल्यामुळेच ती सूडबुद्धीने सर चार्लस्ला—आपल्या आईच्या माजी प्रियकराला—प्रथम घटस्फोटाच्या भानगडीत गोवते. मात्र तिच्या स्वतःच्या प्रियकराबरोबर पळून जाण्याचा तिचा बेत फिसकटल्यावर ती गरीबपणे सत्यस्थितीचे निवेदन करणारी जबानी सर चार्लस्ला लिहून देते.





अनुक्रमणिका

एव्हाना मिसेस रॉझिटर सर चार्लस्‌कडे येऊन, घटस्फोटाच्या खटल्यातील आपल्या मुलीची जबानी चेंबरलेनने तिचे मन वळवून तिला कशी मागे घ्यावयास सांगितली याचा गौप्यस्फोट करते. सर चार्लस् चेंबरलेनला जाब विचारतो, तेव्हा तो सांगतो की निवडणुकीच्या प्रचारात विघ्न येऊ नये म्हणून मला तुझ्या अब्रूवर असे पांघरूण घालावेच लागले! ("तरी मी तुला सांगत होतो या बायकांना चार हात दूर ठेव म्हणून!") चेंबरलेनच्या या फितुरीमुळे सर चार्लस्‌ला एवढा मोठा धक्का बसतो की तो तेथल्या तेथे मिसेस क्रॉफर्डने सही करून ठेवलेली जबानी फाडून टाकतो! नाटक इथेच संपते.

नाटकाच्या चार अंकांपैकी दोन सर चार्लस्‌च्या अभ्यासिकेत तर दोन मिसेस् रॉझिटरच्या घरात आलटून पालटून आपल्या डोळ्यांसमोर उलगडत जातात. हे सेटस् ब्रायन जोन्स यानी अतिशय आकर्षकपणे, व्हिक्टोरिया राणीच्या काळातील स्थापत्याला साक्षी ठेवून, उभे केलेले होते; अन् ते बदलतदेखील अवघ्या पाच मिनिटांत! (म्हणजे अंक चार असले तरी मध्यंतर एकच) गेल्या शतकातील पात्रांचे पोशाख, विशेषत: स्त्रियांचे पायघोळ, उंची झगे, पॉलीन जोन्स यानी चोखंदळपणे निवडलेले होते—आणि सर्व नटनटी हे अवघड पोशाख घालून वावरतही सराईतपणे!

प्रयोगात सर्वात उत्कृष्ट काम झाले ते मिसेस क्रॉफर्डच्या भूमिकेत उर्शुला प्रिन्स यांचे! त्या दिसायला अतिशय देखण्या आहेत; त्यांची संवादोच्चाराची पद्धत व्यावसायिकांच्या तोडीची आहे, आणि त्यांचा चेहरा सूक्ष्मतर भावना ज्याच्यावरून झरझर सरकत असतात अशा एखाद्या जलाशयासारखा आहे. नवऱ्याने छेडल्यावेळी त्याला आपल्या अनैतिक वर्तनाची हकीकत सांगून, मिसेस क्रॉफर्ड अखेरीला जेव्हा अक्षरश: त्याच्या पाया पडून घटस्फोटापासून त्याला परावृत्त करते, जेव्हा ती अशाच प्रकारे आपल्या प्रियकराकडून ठोकरली जाते, आणि जेव्हा अखेरीला कोंडीत सापडलेल्या परिस्थितीत आपल्या जबानीवर सही करण्यासाठी ती सर चार्लस्‌च्या अभ्यासिकेत प्रवेश करते तेव्हा या नटीचे बेअरिंग आणि तिचा अभिनय पाहण्यासारखा होता.



मराठी रंगभूमीवरही इतकी संवेदनाक्षम व व्यक्तित्वसंपन्न नटी क्वचितच आढळते असे म्हणण्यात बिलकूल अतिशयोक्ती होणार नाही.

सर चार्लस्‌चे काम करणारे जर्सन दा कुन्हा (हे साहेब नाहीत; आपले गोवेकरच!) हे मुंबईच्या आंग्लभाषीय रंगभूमीवरील एक मातब्बर नट. उंचीपुरी शरीरयष्टी, भरदार आवाज आणि भूमिकेचा उत्तम समज या देणग्या त्यांना लाभलेल्या आहेत. त्यांचे काम डोळ्यात भरण्याजोगे झाले खरे, परंतु उर्शुला प्रिन्स यांच्या मानाने ते फिकेच वाटले.

इतर नटनटचांची अपरिचित नांवे देऊन मी तुम्हाला गोंधळात टाकीत नाही. थोड्याफार फरकाने प्रत्येकाने आपापले काम समजून उमजून केले. चेंबरलेनच्या भूमिकेत आपल्या चष्मेवजा भिंगानिशी जॉन स्मिदर्ड शोभून दिसले.

दुसऱ्या एका गोष्टीचा खुलासा करायला हवा. मिसेस क्रॉफर्डची आई मिसेस रॉझिटर ही सर चार्लस्‌ची प्रेयसी कशी होऊ शकेल? याला उत्तर असे की चाळीशी उलटून गेल्यावरही तीन पोरींची एखादी आई आकर्षक दिसू शकते—आणि आपल्या किंचित् छटेल पोशाखातून कॅरोलीन ग्रेव्ह या नटीने हे मार्मिकपणे सूचित केले!

या नाटकात एक चुंबनदेखील आहे बरे का! मिसेस क्रॉफर्ड जेव्हा पहिल्या अंकात सर चार्लस्‌ला भेटायला येते तेव्हा हा प्रकार घडतो (त्याचे दुसऱ्या बाईशी लग्न ठरलेले असूनही!) हे चुंबन रंगमंचावर अभिनयाचा, भावाभिव्यक्तीचा एक भाग म्हणून, नि:संकोचपणे घेतले गेले. क्वचित अभिनय मिळमिळीत वाटला तरी साहेब लोकांच्या नाटकातील या एका वैशिष्ट्याची मऱ्हाटी नाट्यरसिकांनी दखल घ्यायला हवी!

## वांद्र्याच्या ख्रिश्चन मंडळींचे नाटक!

इंग्रजी नाटक केवळ गोरे लोकच करतात असे नव्हे. इंग्रजी बोलता येणारे देशी लोकसुद्धा ते करू शकतात. गेले काही महिने मुंबईत जोरात चाललेले, अदी मर्झबान यांनी बसविलेले इंग्रजी नाटक 'बेअरफुट इन द पार्क' याचे उदाहरण घ्या! यातली सारी मंडळी पारशी किंवा ख्रिश्चन होती. क्वचित् विजया जयवंत, मनोहर पितळे, अलकनंदा समर्थ यांच्यासारखी मराठी नांवांची परंतु साहेबांच्या तोडीचे इंग्रजी बोलणारी लोकंसुद्धा इंग्रजी नाटकांतून चमकून गेलेली आहेत.

हे 'बेअरफुट इन द पार्क' लिहिणाऱ्या नील सायमनचेच दुसरे एक नाटक अलीकडे पाहिले. तेसुद्धा विनोदी. त्याचे नांव 'कम ब्लो युवर हॉर्न'! या नांवाचा अर्थ काय म्हणाल तर मला विचारू नका. नाटक बसविले होते वांद्रा प्लेयर्स नांवाच्या संस्थेने. प्रयोगातली सर्वच मंडळी शिकाऊ होती. तरी वांद्र्याच्या मूळ प्रयोगाची इंग्रजी वर्तमानपत्रांनी खूप तारीफ केली (पैकी एकाचा समीक्षक मला सांगत होता, की वांद्र्याला जाऊन नाटक पहाणे

मला जमले नाही; म्हणून मी 'टाईम्स'च्या परीक्षणावरून माझे परीक्षण लिहून काढले!) आणि याचा परिणाम असा झाला की या मंडळीनी ते चक्क गवालिया टॅन्कवरील तेजपाल नाटचगृहात लावले!

तिकिटांचे कॅनव्हासिंग केल्यामुळे की काय, या नाटकाला खूप गर्दी होती. स्वतंत्र पक्षाचे खासदार पिलू मोदी हे पुढल्या रांगेत होते. मोठमोठचाने हसत होते. (त्यांच्या देहाची ज्यांना कल्पना आहे त्यांना "गडबडा लोळत होते" असे वर्णन करणे रास्त ठरणार नाही हे सांगायला नकोच!). तेच का सारा प्रेक्षकवर्ग नाटकाच्या प्रयोगावर खूष होता!

आता तुम्ही विचाराल, हे कसे काय? तर याला उत्तरे दोन: एक म्हणजे काही लोक हसायचा निर्धार करूनच विनोदी नाटक पाहायला येतात! दुसरे–जास्त पटण्याजोगे–उत्तर म्हणजे नील सायमनचे मूळ नाटकच बऱ्यापैकी होते. आईवापांपासून दूर ब्रह्मचर्यावस्थेत राहाणारा एक छंदीफंदी तरुण आपल्या धाकटचा भावाला सुद्धा जेव्हा मजेत कसे जगावे याचे धडे देते तेव्हा जे मजेदार प्रसंग उद्भवतात त्याचे या नाटकात फार्सवजा चित्रण केलेले आहे. बांद्रा प्लेयर्सनी या मूळ नाटकात मुंबईच्या आजच्या जीवनातील संदर्भ फार खुबीने पेरलेले होते, अन् जेव्हा जेव्हा संवादात ते प्रकट होत तेव्हा या हौशी प्रेक्षकाना गुदगुल्या होत.

खरे म्हणजे यातले जेमतेम दोन नट बऱ्यापैकी होते; इतरानी कॉलेजच्या संमेलनापलीकडे रंगमंचावर क्वचितच पाऊल टाकले असावे. उपरिनिर्दिष्ट जर्सन दा कुन्हा आपल्या उपनगरातील बांधवांचे अभिनयनैपुण्य पाहण्यासाठी आलेले होते. त्यांच्या अंगावर निश्चित् काटा उभा राहिला असेल!

पण तुम्हाला दुसरी एक गंमत सांगतो. काही महिन्यापूर्वी याच तेजपाल नाटचगृहात काही उत्साही कॉलेजकुमारांनी सॅम्युअल बेकेट या न–नाटचकर्त्याचे 'एन्डगेम' हे अतिशय गहन असे नाटक सादर केले. प्रयोग अगदी रद्दी झाला. प्रेक्षक सारखे अधून मधून उठून जात होते. प्रेक्षागृहात होतेही मोजकेच!

बेकेट हा एक अतिशय थोर नाटककार आहे. त्याच्या 'वेटिंग फॉर गोदो'चा एक उत्कृष्ट प्रयोग ई. अल्काझींनी त्यांच्या मुंबईच्या वास्तव्यात बसविलेला होता. मनोहर पितळे आणि आत्माराम भेंडे या दोघा कलावंतानी त्याच्या 'क्रॅप्स लास्ट टेप'चे अनुक्रमे इंग्रजी व मराठी प्रयोग फारच अविस्मरणीय शैलीत सादर केले होते. परंतु न-नाटच एकंदरीत बसवायला कठीणच! या कॉलेजकुमारांनी लहान तोंडी मोठा घास घेण्याची चूक केली.

पण सांगायची गोष्ट अशी की 'एन्डगेम'च्या दोनचार प्रयोगांतून खर्चवेच वजा होऊन या मंडळींच्या हाती चक्क चार हजार रुपये आले! या रहस्याचा उलगडा करायचा म्हणजे मराठी व आंग्लभाषीय रंगभूमी या दोहोंच्या प्रचलित प्रथांमधील एका विशेष फरकाचा उल्लेख केला पाहिजे. इंग्रजी नाटचप्रयोगांना जाहिरातींनी खच्चून भरलेल्या कार्यक्रमपत्रिका (प्रोग्राम्स) दारावर विकल्या जातात. सुटाबुटात नाटक पाहायला येणारी फॅशनेबल् मंडळी एकेक रुपया देऊन एक पत्रिका विकत घेतात. या पुस्तिकेत (काही वेळेला एकच घडीचे कार्ड असते)! पात्रयोजनेखेरीज क्वचित्च दुसरा काही वाचण्याजोगा मजकूर असतो.

हौसेखातर–व क्वचित् धर्मादाय–इंग्रजी नाटकाचे प्रयोग करणाऱ्या मंडळीना हे कार्यक्रमपत्रिकांचे (नुसती विक्री नव्हे, तर जाहिरातीदेखील!) उत्पन्न फार मोठे असते! नाटचगृह रिकामे असूनहि 'एन्डगेम'ला चार हजाराचे उत्पन्न झाले ते यामुळेच! उलट हौशी मऱ्हाटी नाटकमंडळचा मात्र जीव मुठीत धरून प्रयोग लावीत असतात! कोण जाहिराती देणार त्यांच्या प्रोग्रा-मला–अन् प्रोग्राम छापलाच तर तो फुकट वाटावा लागेल! दारात छवकडचा पोरी ठेऊन त्यांच्या हातून तो एकेक रुपयाला विकायची कोणाची छाती आहे?



**'बालिका वधू' या बंगाली चित्रपटातील, नवपरिणित दांपत्याच्या शय्यागृहाचे दृश्य; डावीकडून पहिली जुई बानर्जी (चंद्रा) व दुसरी मौशुमी चतर्जी (रजनी)**

## बालवधूचे बंगाली रूप

मुंबईत गेली काही वर्षे फिल्म सोसायटचांची चळवळ चांगलीच फोफावलेली आहे. नेहमीच्या चित्रपटगृहात सहसा पाहायला न मिळणारे, कलात्मक दृष्टचा उच्च दर्जाचे चित्रपट या संस्था आपल्या सभासदांना दाखवीत असतात. अधुनमधून काही खास चित्रपटमहोत्सवही त्यांच्यातर्फे आयोजित केले जातात. नेहमीप्रमाणे मराठी रसिक या कार्यक्रमाकडे फार मोठ्या संख्येने फिरकत नसले (खरे म्हणजे साहित्यकला-विषयक चोखंदळपणा येथील गुजराती मंडळीत कितीतरी पटीने जास्त आहे) तरी दोनचार निवडक मराठी साहित्यिकांची, समीक्षकांची हजेरी या चित्रपटांना लागत असते. क्वचित् एखाद्या मराठी वृत्तपत्रात या चित्र-








पटांबद्दल आवर्जून लिहिलेही जाते. एरवी कलात्मक पाश्चात्य चित्रपट आणि मराठी वृत्तपत्रांतील चित्रपट–समीक्षक यांचे नांवांच्या उच्चारापासूनच जणु वैर!

गेल्या महिन्यात फिल्म फोरम या संस्थेतर्फे ताराबाई हॉल-मध्ये दाखविण्यात आलेला 'बालिका वधू' हा बंगाली चित्रपट पाहिला, आणि वाटले की बंगालमध्ये केवळ सत्यजित राय हे एकच पहिल्या दर्जाचे चित्रपट-दिग्दर्शक आहेत असा आपला चुकीचा समज आहे. मी स्वतः आतापर्यंत पाहिलेल्या बंगाली चित्रपटांवरून रायबाबूखेरीज ऋत्विक घटक, मृणाल सेन व तरुण मजुमदार असे आणखी चारसहा तरी प्रतिभावंत दिग्दर्शक बंगालमध्ये सध्या आघाडीवर आहेत असा निष्कर्ष सहज काढता येईल.

'बालिका वधू'चे दिग्दर्शक आहेत तरुण मजुमदार. यापूर्वी त्यानी व्ही. शांताराम यांच्यासाठी बंगालीत 'पलातक' नांवाचा एक चित्रपट दिग्दर्शित केलेला होता. तो चांगला चालला; परंतु शांताराम यानी, का कोण जाणे, त्याचे हिंदीकरणही केले नाही की तो मुंबईत दाखविण्याचीही व्यवस्था केली नाही!

चित्रपटाची कथा अगदी साधी आहे. विसाव्या शतकाच्या सुरुवातीला लॉर्ड कर्झन यानी जनतेवर लादलेल्या बंगालच्या फाळणीमुळे अवघा बंगाली समाज खवळून उठला होता. काही वर्षे आधी मोठे सामाजिक कार्य करून गेलेल्या ईश्वरचंद्र विद्यासाग-रांच्या सुधारकी विचारांचे वारे सुशिक्षित वर्गात खेळत होते. या राजकीय व सामाजिक पार्श्वभूमीवर अमल नांवाचा अठरा वर्षांचा विद्यार्थी आणि त्याच्याही पेक्षा वयाने लहान असलेली त्याची नवपरिणित वधू रजनी यांच्या वैवाहिक जीवनातील पहिल्या काही दिवसांच्या ऊनपावसाच्या खेळाचे मोठे रम्य आणि काव्यात्म चित्र तरुणबाबूनी रेखाटलेले आहे.

रजनीचा ओढा लग्न झाले तरी आपल्या माहेराकडे असतो. ती सारखी आपल्या नवऱ्याला एकटी टाकून माहेरी पळ काढीत असते. अमलचा मित्र शरद याचा विवाह त्याच सुमाराला अमलची धाकटी बहीण चंद्रा हिच्याशी झालेला असतो. शरद आपल्या मित्राला या अडचणीतून मार्ग कसा काढावा या संबंधाने वेळो-वेळी सल्ला देतो; परंतु अन्तर्मुख मनाच्या अमलच्या हातून काहीच घडत नाही. तो केवळ धुसफुसत राहतो!

एकदा रजनी आपल्या आईवडिलांबरोबर यात्रेला जाते. नाना पवित्र स्थळांना भेटी देऊन मंडळी कोनारकला आल्यावेळी ती त्या प्राचीन देवालयाच्या भिंतीवरील व स्तंभावरील मिथुन-शिल्पे पाहते. त्या दिव्य कलाकृतींच्या द्वारे व्यक्त होत असलेली प्रियजनांच्या उत्कट संमीलनाची घटना पाहून अमलविषयीचे सुप्त प्रेम त्या बालवधूच्या अंतःकरणात उचंबळून येते. साक्षात्कार झाल्यासारखा तिला आपल्या विवाहाचा अर्थ कळतो, आणि आपल्या पतीकडे, प्रियकराकडे ती धाव घेते!

ही कथा जर आपल्या एखाद्या मराठी चित्रपटनिर्मात्याच्या हाती असती तर त्याने जयश्री गडकर नाही तर उमासारख्या उफाडयाच्या अंगाच्या नटीची रजनीच्या भूमिकेसाठी योजना केली असती हे निश्चित् समजा! उलट तरुणबाबूनी रजनी व चंद्रा या दोन षोडशींच्या भूमिकांसाठी विशाल, भावदर्शी डोळयांची देणगी लाभलेल्या मौशुमी चतर्जी व जुंई बानर्जी या, कौमार्य व तरुण यांच्या सीमारेषेवरील नटींची निवड केलेली आहे. आपल्या अवखळपणाने आणि लाखात एक अशा अभिनयकौश-ल्याने त्या दोघी लागलीच आपले मन जिंकतात!

त्यातही किंचित् बालसदृश आवाजाची मौशुमी तर आपल्या अत्यंत कठीण अशा भूमिकेशी इतकी समरस होऊन गेलेली आहे की अर्धस्फुट शृंगारापासून तो विव्हलतेपर्यंत नाना जातीच्या भाववृत्ती ती किती सुलभतेने आपल्या आविर्भावांद्वारे साकार करते हे पाहून आपण थक्क होतो! तिच्या आवाजानेच मुळी कानांवर सारखे मोरपीस फिरविल्यासारखे वाटते. मौशुमीच्या व्यक्ति-मत्वाची खानदानी तर बेजोड आहे.

चित्रपटातल्या इतर भूमिकाही अस्सल होतात. सत्यजित राय यांचे नेपथ्यकार व छायाचित्रकार यांचा हातभार 'बालिका वधू'च्या निर्मितीला लागलेला आहे; त्यामुळे छायाचित्रण तर कल्पकता-पूर्ण झालेले आहेच, परंतु बंगाली घरांचा एकेक सेटसुद्धा स्टुडि-ओची यत्किंचितही आठवण करून देत नाही.

असे असूनही वास्तवतेच्या दृष्टीने या चित्रपटात एक मोठे वैगुण्य राहिलेले आहे. अधुनमधून यात गाण्यांची पखरण आहे. अर्थात् त्यातील बहुतेक रविन्द्रसंगीताच्या पठडीतील भावगीते, लोकगीते अगर नाटचगीते आहेत आणि दिग्दर्शकाने नायकनायिकेला गायला लावलेले नाही हे खरे असले, तरी ही एक तडजोड आहे हे नाकारता येणार नाही! 'बालिका वधू'ची आता हिंदी आवृत्ती निघणार आहे; यावरून या संगीताचा एकंदर रोख उघडच दिसतो.

गाण्यांमुळे या चित्रपटाचा कस उतरतो. उलट त्याच्या कथा-नकाची राजकीय पार्श्वभूमी मात्र बव्हंशी एखाद्या पडद्यासारखी दूरवर राहते. या चित्रपटातील सर्वात हृदयस्पर्शी प्रसंग सांगू का कोणता तो? मध्यरात्र उलटून गेल्यावर पोलीस अमलच्या घरी यतात. आणि अमल व त्याचा छोटा भाऊ यांना ज्यांची शिकवणी असते त्या वृद्ध, टागोरभक्त गुरुजींना अटक करून नेतात. हा! या गुरुजींच्या खोलीत पोलिसांना बॉम्ब सापडतात! गुरुजींना हातकडया घालून पोलीस नेत असताना वरच्या मजल्या-वरील खिडकीत घरातल्या बायका उभ्या असतात त्यांचा निरोप घेण्यासाठी म्हणून गुरुजी ज्या व्यथित परंतु धीरगंभीर नज-रेने आपल्या चष्म्याच्या काचातून त्यांच्याकडे पाहतात ती नजर म्हणजे शब्दहीन परंतु समर्थ अभिनयाचे एक हृद्य प्रात्यक्षिक आहे. ही भूमिका करणारा नट कोण आहे मला कल्पना नाही; परंतु एकदोन क्षणांच्या अवधीत तो आपल्या मायदेशाच्या स्वातंत्र्यपूर्व कालातील यातनांचे एक मोठे करुणोदात्त चित्र उभे करतो!

ज्या क्षणी आपल्या मऱ्हाटी चित्रपटांत हृदयाला चटका लावणारा, आणि आपल्या देशाच्या इतिहासाची इतकी ज्वलंत आठवण करून देणारा, असा एखादा प्रसंग दिसेल, ज्या क्षणी त्यात एखादी मौशुमी चतर्जी अवतरेल त्या क्षणी त्यांना श्रेष्ठता लाभलीच म्हणून समजा!

● ● ●








## साहित्यातील (अजब) लोकशाही

'लोकशाही' हा आजच्या भारताचा परवलीचा शब्द आहे. लोकशाही म्हटली की 'लोक' आले. लोक आले की 'लोकमत' आलेच. लोकमत आले की 'लोकमता'ला मान आलाच. मग 'जन्ते'चे कौतुक आले. खरीखोटी (नाटकी) भलावण आलीच. मग टाळयांसाठी "लिटरेचर ऑफ् द पीपल, बाय द पीपल, ॲण्ड फॉर द पीपल" सारखी वाक्ये आली. मग "फॉर द् पीपल" पुस्तक प्रदर्शने आली. तथाकथित (स्वस्त) आवृत्त्या आल्या. प्रसिद्धीपूर्व सवलती (खपाची केवढी सोय) आल्या आणि 'जन्ते'चे हे कौतुक तिला कमी वाटू नये म्हणूनच की काय (सरकारी पारितोषिके गतवर्षी दिली गेली नाहीत म्हणून) यंदा 'ललित' पारितोषिक योजना निघाली. "लोकहो, वाचा—भरपूर (शक्यतो विकत घेऊन) वाचा आणि मते कळवा" असे 'पुढारी' आवाहन करण्यात आले. तमाम मराठी जनतेने वाचनाचा (नवा) छंद लावून घेतला.

'ललित' पारितोषिकांचा जो 'प्रयोग' झाला. वाचकांना 'कौल' द्यायला सांगितले गेले. त्यांच्यापैकी १२४८ वाचकांनी (म्हणे) मते दिली. (हा निकाल गुलदस्तातच राहणार आहे असे समजते) त्यांच्या गुणक्रमे ३० पुस्तके 'निवडली' गेली. झाले. 'लोकशाही जनमत कौल' वगैरे खेळ खलास! मग आली 'निवड समिती.' मग निवड समितीने निवड कशी केली? तिच्या कसोटया काय? तिला मुळात अधिकारच काय? जनमत कौल मग कशासाठी? हा लोकशाही प्रयोग की घेडगुजरी प्रयोग? ही १२४८ वाचकांची चेष्टा की लोकशाहीची थट्टा? मतेच जर मागवली तर जास्तीत जास्त मते मिळविणाऱ्या पुस्तकाला पहिले बक्षिस कां नाही? त्या कौलात जाहीर झालेल्या निकालातील पुस्तकांना किती किती मते मिळाली ह्याचे 'सत्य' (कटु असेल कदाचित) कथन 'योजना'कार करतील काय? सरकारी 'निकाल' आणि हा



लोकशाहीचा (?) 'निकाल' ह्यात तसा फरक काय पडला? १२४८ वाचकांचा कौल नेमका काय होता ह्याचे आकडे जनतेला (निदान लोकशाहीच्या ह्या प्रयोगात भाग घेणाऱ्या (सक्रिय) १२४८ वाचकांना तरी) कळणे अगत्याचे वाटत नाही काय? मग परिक्षकच जर 'मते' देणार होती तर त्यांनीच पाच पुस्तके (त्यांच्या आवडीचीच जर कदर होणार हे ठाऊक होते तर) निवडायची. द्यायची. लोकशाहीचा हा तमाशा करण्याची मुळात गरजच काय होती? त्यात तत्व कोणते? ललित पारितोषिक समितीने वाचकांची 'मते' लोकशाहीच्या पद्धतीला डाग लागू नये म्हणून तरी जाहीर केली पाहिजेत. अन्यथा हा प्रयोग म्हणजे खाजगी पातळीवर सरकारी (पद्धतीचे) बक्षिसे (परस्परांना) देण्याघेण्याचा एक नवा प्रयोग येवढेच त्याचे (ललित) फलित राहील. जनतेची मते विचारात न घेता हा 'तज्ञ' निकाल 'लोकशाही'च्या नांवावर खपविण्याचे ढोंग कशासाठी? लेखक ठरलेले, प्रकाशक ठरलेले. निर्णय ठरलेलाच. मग ह्या 'योजना' तरी कशासाठी? निदान ही अर्धवट 'लोकशाही' काय कामाची? मंडळी, घ्या ही (लंगडी) लोकशाही. आणि आता (नाइलाज म्हणून) करा अभिनंदन यशस्वी पुस्तकांचे व लेखकांचे!! (आणि निवड समितीचेही).

## भाषा (आणखी एक डोकेदुखी)

आणि शासकीय 'घोळ'ही! देश स्वतंत्र झाला. इंग्रजी राज्य गेले. आमचे मंत्री आणि संत्री आले. आणि इये देशी क्रांति घडली (असे म्हणतात) स्वतंत्र झाल्यावरही वीस वर्षानंतर आम्ही काही ठाम पावले टाकू शकत नाही अशी स्थिति दिसते. प्रत्येक योजना, कल्पना, देशाच्या हितासाठी म्हणून आखली गेली. विचार पूर्ण झालेला नसला वा संभाव्य घोके घ्यानी घेतलेले नसले की मग जे हितकर ते बाधक ठरते. भाषावर प्रांतरचना ही 'सोय' ठरायच्या ऐवजी प्रांतीय शत्रुत्वाची 'नांदी' उरली. स्वतंत्र देशाला स्वतःचा सांस्कृतिक, धार्मिक, ऐतिहासिक वारसा सिद्ध करू शकणारी 'भाषा' असली पाहिजे. तशी ती साऱ्या देशांना असते. आपल्या घटनेने सर्व घटकांचा नीट अभ्यास करून 'हिंदी'ला कौल दिला. स्वातंत्र्याच्या आंदोलनात आम्हाला 'हिंदी'ने साथ दिली. हिंदी प्रचार, शिक्षण, साहित्य ह्या गोष्टींचा गांधीजींनी हिरीरीने पुरस्कार केला व भारतभर राष्ट्रभाषा प्रचार समिती, वर्धाचे जाळे पसरले. आपल्या देशात जो राष्ट्रवाद रुजला तो 'प्रतिक्रियात्मक राष्ट्रवाद' होता असे आता म्हणावे लागते. अन्यथा 'साहेबा'च्या काळात जे जे 'घर्म्य' योग्य ठरले ते ते सारे आज वादविषय होतेच ना! 'हिंदी' धर्म ठरला. आज वीस वर्षानंतरही काही ठाम पावले टाकायचे ठरविताच गदारोळ उठतो. राजिनामे दिले जातात. 'साहेबा' च्या भाषेसाठी स्वतंत्र देशातले (तथाकथित) स्वतंत्र नागरिक हाणामार, लुटालूट, जाळपोळ करतात. हे दृश्य मोठे केविलवाणे आहे. साहेब येण्यापूर्वी ह्या देशात काही म्हणता काही घडले नाही? इंग्रजी न येणाऱ्यांची सांस्कृतिक, राजकीय, वैज्ञानिक प्रगति थांबते? सारे विज्ञान हे फक्त इंग्रजीतच आहे? इंग्रजी आलीच पाहिजे—तशा तर







जगातल्या सर्व प्रगत राष्ट्रांच्या भाषा ह्या अप्रगत देशातल्या जनतेने शिकाव्या असे आमचे मत आहे. शास्त्रे, विज्ञान कला, संस्कृति विषयक 'प्रगत' विचार आलेच पाहिजेत; घेतलेच पाहिजेत. इंग्रजांच्या भाषेमुळे 'राष्ट्रीय ऐक्य' धोक्यात येईल म्हणणारी माणसे अजून 'गुलामी'च्या झापडीतून मोकळी झाली आहेत असे म्हणता येणार नाही. न्या. छगलांनी हे 'तत्व' केले आहे. 'फाळणी'चा भयानक अनर्थ घडला तेव्हा हे तत्व-निष्ठ छगला संप्रदायी लोक कुठे गेले होते? इंग्रजीसाठी बलिदाने करणारी ही माणसे ह्या पुण्यपुरातन देशावर साहेबाने फाळणी लादली तेव्हा कां लढली नाहीत? तो मानाचा 'विषय' नव्हता? तत्वनिष्ठेचा विषय नव्हता? कधी तरी ठाम भूमिका घेणे अगत्याचेच नव्हते काय? बदलाचे दृष्टीने काही तयारी करायला नको काय? "सध्या वेळ योग्य नाही म्हणे" मग ती कधी येणार? कोण आणणार? संशोधन कोण करणार? भाषांतरे कोण करणार? वीस वर्षे गेली. किती गेली म्हणजे हे घडेल असे छगलाजींना वाटते? मग ते ठरले असूनही वीस वर्षात कां घडले नाही? आम्ही इंग्रजीचा द्वेष करीत नाही. पण 'इंग्रजीवरून' आमच्यात फूट पडावी हे दृश्य मात्र आम्हास विद्ध करते. इंग्रजीचे नसते प्रभुत्व मात्र कमी व्हावे असे शासनाप्रमाणेच 'स्वतंत्र' जनतेला वाटते. अडचणी आहेत. पण 'इंग्रजी-' साठीही आम्ही तेव्हा (व आताही–खेरांची कृपा) काही अडचणी सोसल्याच की! 'हिंदी'च्या अपुरेपणाचा बाऊ केला जातो (काही प्रमाणावर तो खराही असेल) पण मध्यवर्ती हिंदी डायरेक्टोरेटचे मुख्य संचालक **प्रो. चंद्रहासन** ह्यांनी 'हिंदुस्थान टाइम्स'च्या वार्ताहराला दिलेल्या मुलाखतीत ह्याबद्दलही 'भ्रम-निरास' केला आहे. प्रो. चंद्रहासन हे मल्याळी शिक्षणतज्ञ असल्याने ते हिंदीच्या आत्यंतिक (व अंध) पुरस्कर्त्यांपैकी आहेत असे कुणीही म्हणणार नाही. ते म्हणतात की विश्वविद्यालयीन शिक्षणाचे माध्यम म्हणून 'हिंदी' रुढ होऊ शकेल. तशी पुस्तके, साहित्य तयार आहे. हा बदल घडवीत असताना इंग्रजी पारिभाषिक शब्दही वापरता येऊ शकतील की! वैद्यक, कायदा, तंत्र शिक्षणाचे दृष्टीनेही 'हिंदी'ची सिद्धता ते प्रतिपादतात. ती संपूर्ण मुलाखत देणे शक्य नाही. पण ह्यात शासकीय सिद्धता आहे हेच सूचित होते. अॅटमबॉम्ब, हिंदु मुसलमान संबंध, काश्मीर, नागा हे सारे 'कागदी वाघ' आम्हीच उभे केले आहेत. आणि ह्या मोहर्रमच्या वाघांना भीत भीत, आम्ही 'कसेवसे' जीव धरून आहोत. 'इंग्रजी' हा असाच एक 'कागदी वाघ' आहे. आम्ही जर वृत्तीने 'स्वतंत्र' असू, तर ही 'गुलामी' फेकून दिली पाहिजे. ४ टक्के (मुख्यत: शहरी) लोक इंग्रजी जाणतात (बोलतात किती संशोधन करा) हिंदी भाषा सर्वत्र बोलली जाते. 'इंग्रजी' जर चांगली (साहेबानेही कौतुक करावे इतकी) शिकता येते तर भारतीय म्हणून अभिमान मिरविणाऱ्या प्रत्येकाला 'हिंदी'-बाबत येवढे संकट कां वाटते? खरे दु:ख वेगळेच असले पाहिजे. पण त्यासाठी शासनाचा हत्ती थांबता कामा नये! हाथि चलत है अपनी चलमो हे संतवचन त्याने पुढे चालवावे. क्षणाक्षणाला "भारतीय ऐक्य बिघडेल"चा बागुलबुवा कशासाठी? वरेचसे घोळ ह्या भीतिग्रस्ततेतूनच उत्पन्न झाले आहेत. शासन त्यातून मुक्त होत आहे हे सुचिन्ह!!

## "शिवसेना"—एक सेन्सेशन

'ती आली, तिने पाहिले, जिंकले' ही उक्ति आज शिवसेना आणि मराठी माणूस ह्यांच्या अन्योन्य संबंधांबाबत म्हणता येण्यासारखी आहे. शिवसेनेचा जन्म एक 'गरज' म्हणून झाला. एक 'व्यासपीठ' म्हणून झाला. एक बोंबल्या' म्हणून झाला. 'शिवसेना' हे नांव अजूनही वाद विषय आहे. पण शिवसेनेला 'मराठी वेदने'ची नस सापडली ह्यात शंका नाही. त्यामुळे ती वेदना जेव्हा (मार्मिक) मुखाने बोलू लागली, तेव्हा बऱ्याच जणांना "जाग" आली. काहीची झोपमोड झाली. तर काहींची कायमची उडाली आहेसे दिसते. वस्तुत: ह्या देशात, 'शिवसेना स्पिरिट' प्रांतोप्रांती वसत आहे. ते 'स्पिरिट' इथे फार आहे म्हणूनच लाल 'हिरवी' साहेबी भुते इथे मधुन मधुन (राजवटींचे) थैमान घालून गेली. घालतातही.' 'एकात्म भारत' वगैरे घोषणा ह्या अधिवेशनातल्या ठरावापुरत्या! तसे नसते तर 'द्रवीड कझकम'चा तीव्र निषेध कामराजांनी केला असता. बंगालमध्ये उडियांवर हल्ले झाले, तेव्हाही सारे 'भारतीय' लोकनेते तेवढेच अस्वस्थ झाले असते. पण तसे घडले नाही. सतत राष्ट्रविचाराची प्रवचने ऐकणारा मराठी माणूस आता जागा झाला आहे, हे पाहताच इंदिराजी-पासून सारी माणसे अस्वस्थ झाली आहेत. मेननच्या दुहेरी पराभवांमुळे कम्युनिस्ट हे शिवसेनेवर तसे उखडूनच होते. त्यांनीही सुरात सूर मिसळून शिव-सेनेविरुद्ध मोठा गळा काढला आहे. शिवसेनेमुळे एक प्रचंड सेन्सेशन तूर्त उत्पन्न झाले आहे खरे! मराठी माण-साच्या न्याय्य हक्कासाठी फक्त महारा-ष्ट्रात निर्माण झालेली 'शिवसेना' ही एखाद्या चमत्कारासारखी अखिल भारतीय कीर्तीची संघटना झाली आहे. व्हिएटनाम, चीन, पाकिस्तानी (चोरटे-भुरटे) हल्ले, नासेर, इत्यादि इत्यादि प्रश्नांबरोबरच 'शिवसेने'चा प्रश्नही सतावीत आहे आमच्या राज्यकर्त्यांना! विशेषत: शिवसेनेने 'टेस्ट केस' म्हणून लढविलेली, ठाणे म्यु.पल निवडणूक जिंकल्यापासून तर हा प्रश्न फारच गंभीर झालेला आहे. 'बंदी घाला' म्हणून मागण्या येत आहेत. पण शासन कोंडीत सापडलेले आहे. शिवसेनेचे यश खुपते. पण प्रश्न तर चुकीचे (वाटत) नाहीत. मार्ग गवसत नाहीत. प्रांतीय भूमिका घेतल्याचा आरोप येईल ही भीति. मग मुंबईचे स्वतंत्र राज्य हवे ही भूमिका पुढे येण्याचीही शक्यता.

शिवसेनेने सेन्सेशन उत्पन्न केले आहे हेच खरे! पण प्रश्न इथेच संपत नाही. मराठी माणसांनी आपण होऊन एकत्र येऊन, आत्मपरीक्षण करून, काही विधायक भूमिका पत्करण्याची खरी गरज आहे.

क्षणिक उद्दीपन यशस्वी झाले असले तरी ते जर योग्य कारणी कार्यान्वित (चॅनलाइज) झाले नाही तर येणारी पोकळी कार्यनाश घडवू शकते हा इतिहासाचा अनुभव आहे. मराठी माणसाचा 'मनस्वी' स्वभाव दृष्टीआड न व्हावा येवढेच तूर्त लिहितो.

**—सारस्वत**








# नटसम्राट गणपतराव जोशी

मराठी रंगभूमीची शान वाढविणाऱ्या नटसम्राट गणपतराव जोशी यांची जन्मशताब्दि अखिल महाराष्ट्रात उत्साहाने साजरी होत आहे.

**गणपतराव=हॅम्लेट**

गणपतराव जोशी हे नांव घेतले की, त्यानी अभिनयकौशल्याने उभ्या केलेल्या 'हॅम्लेट' ची आठवण व्हावी, अशा प्रकारची लोकप्रियता त्यानी आपल्या हयातीतच मिळवून ठेवली. शेक्सपिअरची नाटके मराठी रंगभूमीवर आणण्यात गणपतरावानी आपले सारे आयुष्य खर्ची केले. आपल्या अभिनय–नैपुण्याने त्यानी ती परकीय कथानकांची नाटके मराठी रंगभूमीवर यशस्वी करून दाखविली. इंग्रजी भाषा न शिकलेल्या सामान्य प्रेक्षकालाहि गणपतरावानी शेक्सपिअर नीट समजावून दिला. मराठी माणसाला शेक्सपिअर आवडू लागला. संगीत नाटकांना चटावलेला प्रेक्षकवर्ग गद्य नाटकांकडे खेचून आणावयाचे सामर्थ्य गणपतरावांच्या अभिनयात होते. म्हणूनच गणपतरावानी मराठी रंगभूमीवर गद्य नाटकांचे एक तेजस्वी पर्व सुरू केले असे मानले जाते. गणपतरावांच्या शाहूनगरवासी नाटक मंडळीचा वारसा महाराष्ट्रात नाटक मंडळीने पुढे चालविला. मराठी नाटकांचे कथाविषय व्यापक होण्यास सुरुवात झाली. ऐतिहासिक काल्पनिक सामाजिक आणि त्या काळच्या राजकारणावर रूपके बसवून पौराणिक कथानके तिखट प्रचारी स्वरुपात रंगभूमीवर दिसू लागली. जुन्या रुळलेल्या मार्गाने पावले न टाकता नव्या दिशेचा मार्ग मराठी रंगभूमीने यावेळेपासून धरला. आज मराठी रंगभूमि भारतामध्ये एक प्रगत रंगभूमि मानली जात आहे.

**नाट्यसृष्टीतील क्रांति**

या क्रांतीचा उगम भाषांतरित नाटकांच्या प्रयोगापासून झाला. शेक्सपिअरची नाटके भाषांतरित, रुपांतरित होऊन प्रमुखत्वाने तीच नाटके प्रयोगरूपाने मराठी रंगमंचावर सादर होत राहिली. त्या प्रयोगाना जनतेने आश्रयहि मोठ्या प्रमाणावर दिला. शेक्सपिअर मराठी रंगभूमीवर नांवाजला गेला. आवडला. नटसम्राट गणपतराव जोशी यानी आपले अभिनय-कौशल्य पणास लावून सुरवातीची नाटके यशस्वी केली. म्हणूनच आणखी प्रगत स्वरुपात नाट्याचार्य खाडिलकराना आपली नाटके महाराष्ट्र नाटक-मंडळीच्या रंगमंचकावर अपूर्व यशदायी अशा स्वरुपात प्रकट करता आली.



**देशभक्त नाटककार**

भारतमाता त्या काळी पारतंत्र्याच्या बेडीत–तुरुंगात होती. देशभक्त पुढाऱ्यांच्या मनात शल्य सलत होते. स्वातंत्र्याचा संदेश देण्यासाठी त्यानी रंगभूमीचा वापर करावयाचे ठरविले. रंगभूमीचे ते माध्यम इतके प्रखर आणि प्रभावी स्वरुपाचे ठरले.

जन्मशताब्दीच्या निमित्ताने गणपतरावांच्या पुण्यस्मृतीला आपण आदरांजली अर्पण करू या. त्यांचा आदर्श समोर ठेवून रंगभूमीवरील कलावंतांनी स्फूर्ति घ्यावी अशी रंगदेवतेपाशी आपण प्रार्थना करू या.

**—आदित्य**

---

# आणखीही तीन आघात

**मृत्यूने** आपल्या विचित्र स्वभावाने महाराष्ट्रातली काही माणसे अलिकडे अगदी अलगद उचलून नेली. ती माणसे गेली. मागे राहिलेली माणसे थक्क झाली. सुन्न झाली. त्या माणसात गोमंतकाचे भूतपूर्व शिक्षणमंत्री **वि. सु. करमली** हे होते. तशाच 'वासवदत्ता' ह्या आपल्या पहिल्याच 'मेजर' प्रॉडक्शनने मराठी नाट्य-रसिकांना विचार करायला लावणाऱ्या सौ. **मीना पेठे** ह्याही होत्या. ही दोन तशी तरुण माणसे. काही नवी नवी स्वप्ने पाहणाऱ्या वयात व उमेदीतच वावरणारी. दोघांचेही मृत्यु तसे आकस्मितच म्हटले पाहिजेत. फरक येवढाच की, करमली ह्यांनी आपण होऊन आपले आयुष्य अक्षरशः मृत्यूच्या हाती झोकून दिले. सौ. मीना पेठे ह्याना नैसर्गिक मृत्यु आला. कै. करमली हे स्वतंत्र गोव्याचे पहिले शिक्षणमंत्री. मोठ्या उमेदीने ते मुंबई सोडून गोव्यात गेले. तेथल्या राजकारणात करमली ह्यांनी रस घेतला. करमली तसे रसिकच होते. नाट्य, काव्य, संगीतादि कलांचा वारसा त्यांना कला नगर गोव्याकडूनच मिळाला होता. मंत्री असूनही मंत्रिपद विसरायला लागणारी ही किमया त्यांच्याजवळ होती. ह्या तरुण, तडफदार, उमेदीच्या माणसाची ही दारुण अवस्था नेमकी कां व कशी झाली हे कोडेच आहे. पण कारणे काहीही असली तरी स्वतंत्र भारतात, स्वतंत्र गोव्यात आशा माणसांना आत्महत्या करावी लागते ही परिस्थिति आमच्या मते अधिक दारुण आहे. करमलींचा मृत्यु हा चिंतेचा विषय आहे. झाला पाहिजे असे आम्हाला वाटते. करमलींच्या अतृप्त आशांनी देवाघरी गेलेल्या आत्म्याला शांति लाभो असेच आम्ही म्हणतो.

सौ. मीना पेठे हे नांव 'वासवदत्ते'मुळेच जरी प्रामुख्याने

मराठी 'कॉमन मॅन'ला ठाऊक झाले असले तरी मराठी नाटयक्षेत्रात वावरणाऱ्या माणसांना ते सुपरिचित होते. त्यांच्या हाती आलेले नाटक विषयदृष्टया नवीन होते. 'वासवदत्ता' मराठीत प्रथमच येत होती. मीना पेठे ह्यांना त्या विषयाने पछाडले. 'वासवदत्ता' हे नाटक तसे पडले. धंदा अंगाशी आला. स्वप्ने विरली. पण त्या नाटकाने काही चांगल्या अपेक्षाही मीना पेठे ह्या स्त्रीबद्दल उत्पन्न झाल्या होत्या. चांगले नाटक हाती आले तर ही बाई त्याचे सोने करू शकेलसे वाटत होते. पण —

झुणका-भाकर, समतानंद, 'गरजणारे' 'निर्भीड'कार, एके काळचे 'मौज'कार अनंत हरि गद्रे हेही कालवश झाले. अशी माणसे मागे ठसे ठेवून जातात. अनंतहरि गद्रे हे आपल्या काही कार्यांमुळे असा ठसा उमटवून गेले आहेत. ते एक 'फॅडिस्ट' होते असे काही लोक म्हणतात. पण 'फॅडिस्ट' माणसेच समाजात काही क्रांति, परिवर्तने घडवून आणू शकतात असे वाटते. ही जाण स्वातंत्र्यवीर सावरकरांना होती. म्हणून रत्नागिरीच्या विजनवासात स्वा. सावरकरांनी सहभोजने घडवून आणली. मंदिर बांधवून घेतले. अनंतराव गद्रे हे सावरकरांचे अनन्य भक्त! त्यांनी झुणका-भाकर सहभोजने तर घडविलीच. पण झुणका-भाकर सत्यनारायणांचे कितीतरी कार्यक्रम घडवून आणले. गद्रे हे 'कृतिशून्य' सुधाकर होते. वर्षानुवर्षे गद्रे ही कामे शांतपणे करीत राहिले. काखोटीस पेपरांच्या घड्या, हाताला अडकवलेली छत्री अशा पोषाखात हा कोल्हटकर शिष्य आपल्या परीने 'संदेशा'चे कार्य करीत राहिला. 'निर्भीड'ने सारे काही 'गर्जून'च सांगितले. अनंतराव तसे मिश्किल होते. लेखणी बोचरी होती. वृत्तपत्रातून छोटया तादुकल्या—चालू विषयावरील—देण्याची प्रथा अनंतरावांनी सुरू केली. पत्र कर्तृत्वापेक्षाही माझ्या मनावर त्यांचा ठसा आहे तो थोर हरिजन सेवक म्हणून. रोटी बेटी बंदी तोडली पाहिजे हे सावरकरांचे ब्रीद वाक्य. रोटीबंदीचे कार्य अनंतरावांनी निष्ठेने केले. निरनिराळ्या गावी गेले. वस्तीतून केले. समाजाला प्रत्यक्ष आदर्श लागतो. अनंतरावानी तो निर्माण केला. तो चालविणे हीच खरी श्रद्धांजली...

**—संपादक**

---

**[पृष्ठ १० वरून ... स्वस्तिक]**

कोणकोणती कामे करावी लागतील आणि कारखानदार झाल्यावर कशी मदत करावी लागेल ह्याबद्दलची 'कर्तव्यपत्रे' लिहिली. पण त्यामुळे बिचकून न जाता जयश्रीबाईनी आपल्या संसाराचा कारखाना 'कांकणभर' अधिकच सरस चालविला.

ह्या देशात आम्हाला म्हणजे हिन्दूंना अनेक गोष्टींची लाज वाटते. हिंदू म्हणवून घेण्याची, व्रतेवैकल्ये करण्याची, पुराण, प्रवचन किंवा कीर्तन ऐकण्याची, सत्यनारायण करण्याची, सगळ्या सगळ्यांची आम्हाला लाज वाटते. आणि 'धर्मातीतपणाचा' अभिमान वाटतो.पण वसंतराव मात्र याला अपवाद आहेत. कारखान्यात प्रवेश करताना 'स्वस्तिक मारुती'चे दर्शन होते. सत्यनारायणावर आणि शनिमहात्म्यावर त्यांची अपरंपार श्रद्धा आहे. दसरा असो, दिवाळी असो. मंगळागौर असो किंवा हळदीकुंकू असो प्रत्येक कार्य थाटामाटाने डौलात करण्यात येते. ह्या सर्व गोष्टी प्रशस्तपणे पार पडाव्यात म्हणून तर बंगल्याला मोठे व्हरांडे काढले आहेत. वसंतराव काही उपास करतात पण त्याचा उपद्रव इतराना नाही. दुसऱ्याकडे गेल्यावर किंवा घराबाहेर पडल्यावर उपास वगैरे गोष्टी ते बासनात गुंडाळून ठेवतात. सांगली मिरजेकडचे असल्यामुळे वसंतरावांची दुधावर व गोडावर भरपूर भक्ति. दुधासाठी गाई आहेत. अगदी दृष्ट लागाव्यात अशा गाई आहेत. ह्या गोमातांची व्यवस्था इतकी उत्तम ठेवली आहे की एखाद्या अतिविशाल महिलेलासुद्धा गोठयात वास्तव करावेसे वाटेल. बाग व भाजीपाला ही खाती गृहखात्याकडे आहेत. 'गृहिणी सचिव: सखी मिथा' हा पूर्वार्ध वैद्य दंपतीच्या संसाराला संपूर्ण लागू पडतो. पण उत्तरार्धाच्या म्हणजे 'प्रियशिष्या ललितेकलाविधौ' ह्या बाबतीत मात्र ह्या नाथांच्या घरची खूण उलटी आहे. वसन्तराव शिष्य आहेत आणि जयश्रीबाई त्यांच्या मार्गदर्शक आहेत.

आप्त असोत, मित्र असोत, काही गरीब असोत, काही श्रीमंत असोत, नागर असोत अथवा खेडवळ असोत, वसंतराव त्याना कधीच विसरत नाहीत. कधी कधी त्यांच्या पुरातन मित्राना संकोच वाटतो. पण हा संपन्न मित्र हात धरून आग्रहपूर्वक आपल्या सोन्याच्या द्वारकेत त्याना घेऊन जातो. पहिल्याप्रमाणेच मोकळेपणाने गप्पा मारतो, पाहुणचार करतो. अशा एखाद्या शाळासोबत्याकडून लग्नाची म्हणा, मुंजीची म्हणा साधी बोटभर चिठ्ठी आली तरी वेळात वेळ काढून वसंतराव त्या गांवाला जातात. यामुळे विद्यार्थीदशेत एका ध्येयाने एकत्र आलेल्या व्ही. पामले मधील तीन शिलेदार वैद्य, मुंडले आणि पाठक आजही एकत्र आहेत. महाराष्ट्रात एक माणूस सुद्धा गुण्यागोविन्दाने राहणे अशक्य, मग तिघांची गोष्टच सोडा. अगदी काहीच नाही तर मराठी माणूस आपल्या पडछायेशी भांडेल आणि तोंडातला तुकडा मात्र गमावील.

वसंतरावाना कवी म्हटले तर ते हसतील. पण त्यांच्या कवित्वाचा साक्षात्कार काही महिन्यापूर्वी आम्हाला झाला. इमारत बांधण्याच्या खर्चाचा अंदाज अशा रुक्ष विषयावरून सुरवात झाली. त्यामधून चिंचवडला स्वस्तिक कारखान्याचा व्याप वाढविण्यासाठी घेतलेल्या ७० एकर जमिनीचा विषय निघाला. काही काळ या स्थितप्रज्ञ माणसाचे देहभान हरपले आणि त्यानी आपण १५ वर्षात ५० लाख रुपये खर्च करून कसा कारखाना उभारणार याचे रोमहर्षक चित्र रंगवले. वसंतराव 'पृथ्वीला सुरलोकसाम्य' करण्यासाठी आमच्यापुढे 'शून्यामाजी वसाहती' वसवत होते. कवी तरी दुसरे काय करतो? येथे कवित्वाला कर्तृत्वाची जोड मिळाली होती.

वसंतराव वैद्यांच्यासंबंधी विचार करताना गोविन्दाग्रजांचे शब्द मला आठवतात. वसंतरावांच्यामध्ये 'चित्पावन बुद्धीची कर्तबगारी आहे, देशस्थांची दिलदारी आहे, कायस्थाचे इमान आहे,' आणि कवीने उल्लेख न केलेला एक गुण सांगतो कऱ्हाडयाचा समतोल आहे.

• • •

अनुक्रमणिका






REGD. NO. MH-450 Licence No. 170 to post without pre-payment OCTOBER 196





COVER PRINTED AT ASHA PRINTERY, BOMBAY-4.




